# मी उभा आहे !

तीन अंकी

नाटक

प्रल्हाद केशव अत्रे

किंमत २ रुपये

: प्रकाशक :
कृ. ना. सापळे,
रामकृष्ण प्रकाशन मंडळ,
त्रिभुवन रोड, मुंबई ४.

★ या नाटकाचा पहिला प्रयोग गुरुवार ता. २३ फेब्रुवारी १९३९ दिनीं रात्रौ बालमोहन नाटक मंडळीनें पुणें येथें विजयानंद नाट्यमंदिरांत करून दाखविला.

---



---



: मुद्रक :
कृ. ना. सापळे,
रामकृष्ण प्रकाशन मंडळ,
त्रिभुवन रोड, मुंबई ४.

महाराष्ट्रांतले अेक आदर्श संपादक
श्रीयुत काकासाहेब लिमये
( ज्ञानप्रकाश )
यांना सादर नि सप्रेम
अ र्प ण

'मी अुभा आहे!' हें माझें आठवें नाटक. वास्तविक हें नाटक गेल्या ऑगस्टमध्यें 'बालमोहन नाटक मंडळी' पुण्यास आल्यानंतर दीड–दोन महि-न्यांतच रंगभूमीवर यावयाला पाहिजे होतें. तथापि पुणें शहर म्युनिसिपालिटीच्या त्रैवार्षिक निवडणुकीसाठीं मी स्वतःच अुभा होतों! निवडणुकी पंधरा ऑक्टो-बरला होत्या. तत्पूर्वी मतदारांना प्रत्यक्ष भेटणें, पेठेतून आणि नगरांतून काँग्रेसच्या कार्याचा प्रचार करण्यासाठीं व्याख्यानें देणें अित्यादि कार्यक्रमांत दोन महिने आटोकाट मेहनत पडली! काँग्रेस पक्ष बहुमतानें नगरपालिकेंत निवडून आल्या-नंतर पक्षाचें नेतृत्व मजकडे आलें! त्यामुळें पक्षसंघटना करणें, नंतर नगरपालि-केच्या कारभारी मंडळींच्या निवडणुकांची पूर्वतयारी करणें, या कामांत अेक महिना गेला! पुढें स्टँडिंग कमिटीच्या चेअरमनचें अत्यंत जबाबदारीचे काम माझ्याकडे येअून पडल्यानंतर नगरपालिकेच्या फारच मोठ्या कामाचा वाटा माझ्याकडे आला. गेले तीन महिने हा कामाचा हिमालय रात्रंदिवस चढतों आहे! अेवढ्या आणि त्याखेरीज अितर व्यवसायांच्या चक्रव्यूहांतून शेवटीं हें नाटक अितक्या अुशिरा का होअीना, हातून पुरें झाले ह्याबद्दल मला समाधान वाटतें!

म्युनिसिपालिटीच्या निवडणुकीचा आणि कारभाराचा गेल्या सात महिन्याचा मला आणि माझ्या सहकारी अुमेदवाराना जो प्रत्यक्ष अनुभव आला, त्याचा हें नाटक लिहितांना मी भरपूर अुपयोग करून घेतलेला आहे. मात्र या नाटकांतील पुष्कळशीं टीकात्मक विधानें किंवा अुपहासगर्भ वाक्यें पुणें शहर म्युनिसिपालिटीच्या पूर्वीच्या किंवा आजच्या सभासदांना नि अधिकाऱ्यांना आणि नोकरांना वैयक्तित दृष्ट्या अुद्देशून लिहिलेलीं आहेत असा कोणीहि गैरसमज करून घेअूं नये! सामान्यतः स्थानिक स्वराज्याच्या कारभारांत आणि निवडणुकींत जे अनिष्ट आणि दूषणास्पद प्रकार चहूंकडे चालले असल्याचें आढळून येतात त्यांचाच मी ठोकळ

मानानें अुल्लेख केलेला आहे ! हें नाटक लिहिण्याचा माझा निष्कर्ष असा. स्थानिक स्वराज्याच्या निवडणुका जोंपर्यंत व्यक्तिनिष्ठ पद्धतीनें लढवल्या जात आहेत तोंपर्यंत लाचलुचपत, भीड-वशिला आणि जुलुमजबरदस्ती अित्यादि गर्हणीय आणि बेकायदेशीर साधनांचा अवलंब करून मतदारांची मतें अुमेदवार मिळविल्याशिवाय राहणार नाहींत ! यामुळेच निवडणुकीला अत्यंत घातुक अशा सामाजिक व्यसनाचें स्वरूप आलेलें आहे आणि या व्यसनापायीं शेंकडों लोकांनीं आपापल्या आयुष्याचा आणि घरादारांचा नाश करून घेतला आहे. अर्थात् त्यामुळें या देशांत 'स्थानिक स्वराज्या'ची धूळदाण होअून लोकशाहीचा जो बदलौकिक झालेला आहे त्याचें वर्णन काय करावें ? निवडणुका पक्षनिष्ठ झाल्या-शिवाय त्यांतील अनिष्ट घातुकपणा नाहींसा होणार नाहीं, स्थानिक स्वराज्याच्या कारभारांतील बेबंदशाहीला आळा बसणार नाहीं आणि देशांत खऱ्या लोकशाहीची प्रतिष्ठापना होणार नाहीं ! स्थानिक स्वराज्य-संस्थामध्यें बहुजन समाजाच्या खऱ्या प्रतिनिधींचा संघटित पक्ष आल्याशिवाय सामुदायिक कल्याणाच्या दृष्टीनें तेथला कारभार चालणें शक्य नाहीं ! म्युनिसिपल कारभाराला 'कचऱ्याच्या राज-कारणा'चे जें स्वरूप आले आहे, त्याचें कारण सामुदायिक हित विरुद्ध प्रत्येक नागरिकाचा वैयक्तित स्वार्थ यांच्या झगड्यांत बेजबाबदार लोकप्रतिनिधींच्या अभावीं झालेली सामुदायिक हिताची पायमल्ली ! म्युनिसिपालिटींत जावयाचें तें स्वतःची किंवा जनतेची वैयक्तित कामें करून किवा करवून घेण्यासाठीं जावयाचें, असाच आतांपर्यंत सभासदांनी शिरस्ता पाडलेला आहे ! सार्वजनिक कल्याणाचे जे न्याय्य नियम असतील त्याला अपवाद निर्माण करून पळवाटा काढावयाच्या यापलीकडे म्युनिसिपालिटींत दुसरें कामच होत नसल्याने, म्युनिसिपालिटीचा कारभार म्हणजे केवळ 'अपवादांचा कारभार' होअून बसलेला आहे ! लोकशा-हीच्या तत्त्वांचा विध्वंस करणाऱ्या या अनिष्ट परंपरा नाहीशा करण्यासाठींच 'स्थानिक स्वराज्य' संस्था संघटित अशा लोकपक्षानें ताब्यांत घ्यावयास पाहि-जेत हा माझा निर्णय आहे !

देशांतील 'स्थानिक स्वराज्य' संस्था हस्तगत करण्याचा सध्यां काँग्रेसने जो अुपक्रम सुरू केला आहे तो किती योग्य आणि अवश्य स्वरूपाचा आहे हें कोणाच्याहि लक्षांत येअील.

'वंदे मातरम्' नाटकापासून प्रचलित राजकीय नि सामाजिक घटना रंगभूमीवर चित्रित करण्याचा जो मी उपक्रम सुरू केलेला आहे त्याचाच याहि नाटकांत अवलंब केलेला दिसून येईल.

अकरा वर्षांनंतर या नाटकाची दुसरी आवृत्ति प्रसिद्ध होत आहे. ज्या परिस्थितींत मी हें त्यावेळीं नाटक लिहिलें, तिच्यामध्यें आतां आमूलाग्र क्रांति झालेली आहे. देशाला स्वातंत्र्य मिळून आज प्रजासत्ताक राज्य स्थापन झालें आहे. स्वातंत्र्याचा लढा पूर्णझाल्यानंतर जनतेचा पक्ष हें कॉंग्रेसचें मूळचें विराट् स्वरूप बदलून आतां कॉंग्रेस हा एक कांही विशिष्ट हितसंबंधाचा राजकीय पक्ष झालेला आहे. ह्या कॉंग्रेसच्या हातून मिळालेल्या राजकीय स्वातंत्र्याचें पर्यवसान आर्थिक आणि सामाजिक स्वातंत्र्यांत होईल असें मला वाटत नाहीं. म्हणून मी कॉंग्रेसपक्ष सोडून 'समाजवादी पक्षा'मध्यें आलों आहे. देशांत आज हाच एक पुरोगामी विचाराचा पक्ष आहे. ह्याच पक्षाच्या हातून देशांत लोकशाही समाजवाद स्थापन होईल असा माझा विश्वास आहे. माझ्या सारख्या पुरोगामी विचाराच्या माणसामध्यें राजकीय क्रांतिमुळें हा जो बदल झालेला आहे, तो लक्षांत घेऊनच हें नाटक वाचाव. या नाटकांत 'कॉंग्रेस' हा शब्द जेथे मी वापरलेला आहे तेथें तेथें देशाच्या स्वातंत्र्यासाठीं लढणारी जुनी जनतेची आघाडी असा त्या शब्दाचा अर्थ समजावा. आजची अधिकारारूढ कॉंग्रेस नव्हे.

२३ फेब्रुवारी १९५०. } **प्रल्हाद केशव अत्रे**

**पात्रें :** ( प्रवेशाच्या अनुक्रमानें )

| | | |
|---|---|---|
| **गोवर्धन** | **बलदेव** | **पिलोबा** |
| **भाअी टोळ** | **ताअी पोळ** | **गिरिजा** |
| **नंदू** | **प्रमोद** | **भिभाशंकर** |
| **चक्रदेव** | **पितांबर** | **प्रमिला** |

घरमालक, भोपळे, ढेकणे अित्यादि

---

**काळ :** म्युनिसिपल अिलेक्शनपूर्वी अेक महिन्याचा.

**स्थळ :** पुणें किंवा तसेंच महाराष्ट्रांतलें अेकादें नगर

# मी अुभा आहे!

## १

गोवर्धन अुर्फ दाजीसाहे अिनामदार, गांवांतील अेक प्रतिष्ठित नागरिक नि म्युनिसिपल कौन्सिलर यांचा दिवाणखाना. गोवर्धन, प्रक्षुब्ध मुद्रेनें फेऱ्या घालीत आहे. बाजूला बलदेव व अितर चाळींतील भाडोत्री अुभे आहेत. भाअी दिगंबर टोळ नि ताअी पद्मा पोळ शेजारी बसलेलीं आहेत. गोवर्धनचा दिवाणजी पिलोबा हा अदबीनें अुभा आहे.

**बलदेव :** मग काय जाअूं म्हणतां आम्ही ?

**गोवर्धन :** ( चिडून ) दरवाजापर्यंत पोंहोचवायला येअूं काय तुम्हांला ! म्हणे जाअूं ! खुशाल चालते व्हा ! पिलोबा, यांना बाहेरचा रस्ता दाखवा !

**बलदेव :** पण आमचं म्हणणं तरी अैकून घ्या !

**गोवर्धन :** काय म्हणणं अैकायचं तुमचं ! तुम्हीं भाडोत्री लोकांनीं मला जीव नकोसा केला आहे ! रोज रोज त्याच तक्रारी अन् तींच रडगाणीं ! अिथं नळ फुटला—तिथ चिखल झाला ! अिथं मोरी तुंबली—तिथं पायखाना पडला ! अिथली पायरी काढा—तिथं खिडकी पाडा ! अिथं गळतंय्—तिथं ठिपकतंय् !

काय-आहे काय !— तुम्हांला माझ्या चाळींत राहायचं नसेल तर अुद्यांचे अुद्यां चाळ खालीं करा !

**बलदेव** : चाळ खालीं करा—अन् जा कुठं !

**गोवर्धन** : मसणांत जा !— मला काय विचारतां ?

**बलदेव** : मसणांत जा ! आज तीनशें बिऱ्हाडं तुमच्या त्या दीडखणी खुराड्याच्या चाळींत, गेल्या तीन पिढ्या कुत्र्यामांजराचं जिणं जगत आहेत—खोलीमागें दोन रुपये असे दरमहा तीनशें दुणे सहाशें रुपये महिन्याचे महिन्याला पठाणी तगाद्यानं तुमचे हे पिलोबा वसूल करून नेतात—आम्हीं गरिबांनीं दिलेल्या भाड्याच्या पैशावर तुम्हीं आपले बंगले बांधलेत—अिमारती उठवल्यात अन् अिस्टेटी थाटल्यात—गेल्या तीन वर्षांत चाळीच्या दुरुस्तीसाठीं एक फुटका छदाम तरी तुम्हीं कधीं खर्च केलेला आठवतो आहे का तुम्हांला ? आम्ही ओरडून ओरडून आमचे प्राण कंठाशीं आले—घसे बसले—जिभा झडल्या ! आणि आज आम्हांला खुशाल सांगतां आहांत, कीं मसणांत जा—आम्ही आपली बायकापोरं घेअून मसणांत जा—अन् तुम्हीं आपल्या बायकापोरांना कवटाळून मात्र या दिवाण-खान्यांत मजा मारा ! चोराच्या उलट्या म्हणतात—

**गोवर्धन** : काय म्हणालास ! चोराच्या उलट्या—माझ्या दिवाणखान्यांत येअून मला चोर म्हणतां ? कसला माज चढला आहे तुम्हां भाडोत्री भिकारड्यांना ! दोन रुपये महिना भाडं देण्याची लायकी नाहीं तुमची ! हल्लींच्या महागाअीच्या दिवसांत अितकी स्वस्त भाड्याची चाळ बांधून द्यायला आहे का तुमचा एखादा बाप तयार ?

**पिलोबा** : काय बोलणं आहे ! शक्य नाहीं !

**गोवर्धन** : घरपट्टी वाढली—नळपट्टी वाढली—ड्रेनेजपट्टी वाढली तरी दोन रुपयांचे सव्वादोन रुपये मागितले, कीं तुमचे डोळे पांढरे होतात—अन् दोन रुपये भाड्यांत तुम्हांला ताजमहाल हॉटेलच्या सोयी पाहिजेत काय ? गोरगरिबांसाठीं स्वस्त भाड्याची चाळ म्हणजे तुमच्यासारख्या अैतखाअू आणि आळशी पोळांना फुकट राहण्यासाठीं काढलेला पांजरपोळ नव्हे !

**बलदेव** : पांजरपोळ ! तुमच्या चाळीपेक्षां पांजरपोळ फार बरा ! तिथं जनावरां-साठीं जेवढी व्यवस्था व सोयी असतील तेवढ्या देखील तुमच्या चाळींत नाहींत ! अिथं तुमच्या बंगल्यांत मात्र प्रत्येक खोलीला अेक अेक नळ, मोरी अन्

फ्लशिंगचा संडास ! अन् तिथं तीनशें बिऱ्हाडांना अेक नळ–तो देखील अर्धा अिंची ! अन् तीन शौचकूप–त्यांतला अेक चाळीच्या भय्यानं स्वतःसाठीं कुलूप लावून राखून ठेवलेला ! आणूं का साऱ्या चाळीतल्या लोकांना रोज सकाळच्या प्रहरीं तुमच्या बंगल्यावर–म्हणजे कळेल ! पट्टी वाढली–पट्टी वाढली म्हणून तुम्ही हाकाटी करतां ? पण पट्टी वाढवली कुणी ?–तुम्हीं—म्युनिसिपालिटीच्या मेंबर लोकांनीं ना ! गेलीं बारा वर्षें तुम्ही आमच्याच चाळींतल्या तीनशें बिऱ्हाडकरांच्या मतांवर हमखास निवडून येतां ! काय केलंय् तुम्हीं आमच्यासाठीं ? गरिबांच्या मतांवर निवडून येतां आणि निवडून आल्यावर तुम्हीच आम्हां गरिबांचे काळ होतां !

**गोवर्धन** : तुम्ही गरीब ! फाटके कपडे घालतां नि घाणेरडे राहतां म्हणून गरीब म्हणायचं होय रे तुम्हांला ? रोज तुम्हांला सिनेमा पाह्यला पाहिजे–हॉटेलांत जायला पाहिजे–दारू प्यायला पाहिजे–तिथं तुमची गरिबी आड येत नाहीं ! तुम्हां गरिबांच्या फाटक्या खिशांत जेवढे पैसे सांपडतील तेवढे आमच्या रेशमी कोटाच्या खिशांत सापडायचे नाहींत ! हल्लींच्या काळांत वाटेल ते हक्क नि सवलती मागायला ज्याला त्याला गरिबी ही चांगली सबब सांपडली आहे ! जेवढं असेल नसेल तितकं गरिबांना पाहिजे ! आणि तें देखील फुकट ! गरिबांना शिक्षण फुकट पाहिजे–औषधं फुकट पाहिजेत–घरं फुकट पाहिजेत–कपडे फुकट पाहिजेत ? नशिब आमचं, कीं गरीब लोक बायका फुकट मागूं लागले नाहींत अजून !

**भाअी टोळ** : मी मधें बोलूं का ? तुम्ही श्रीमंत लोक पैशाच्या जोरावर बायका खरेदी करतां म्हणून गरिबांच्या लग्नाला देखील बाजारी स्वरूप आलेलं आहे ! नशिब समजा तुमचं, कीं गरीब लोक अद्यापि जागे झाले नाहींत–ते एकदां खडबडून जागे झाले म्हणजे तुमच्या तिजोऱ्या आणि तुमचे जनानखाने अेका क्षणांत ओस पडतील !

**गोवर्धन** : ( आश्चर्यानें ) म्हणजे !– तुम्ही कोण ?

**भाअी टोळ** : मी कोण ? मी गरिबांचा वाली–मजुरांचा पुढारी–कामकऱ्यांचा कैवारी–श्रीमंतांचा वैरी–भांडवलशाहीचा दुष्मन्–साम्राज्यशाहीचा काळ–अन् नोकरशाहीचा बाप ! मला तुम्ही ओळखत नाहीं ?–( पद्माकडे बोट दाखवून ) निदान यांना तरी ?

**ताअी पोळ** : म्हणजे !–मला ओळखत नाहीं तुम्ही !

**गोवर्धन :** वा ! तुम्हांला ओळखत नाहीं असं कसं होईल ! तुम्ही सरोजिनी नायडू अन् हे जवाहरलाल नेहरू नव्हेत का ? पिलोबा, यांना बाहेरचा रस्ता दाखवा—

**भाअी टोळ :** थांबा ! दोन वेळ पोटाची खळगी भरत असली म्हणजे असला राक्षसी विनोद कोणालाहि सुचतो ! हें पहा, साऱ्या हिंदुस्थानचा नसलों तरी माझ्या बोळांतला तरी मी जवाहरलाल नेहरूच आहे—आणि याहि आपल्या गल्लींतल्या सरोजिनी नायडूच आहेत ! तुमच्या श्रीमंती दिवाणखान्यापर्यंत आणि विलासी रंगमहालापर्यंत आमचीं नांव पोंहोचलीं नसलीं तरी ह्या शहरांतील प्रत्येक गरिबाच्या चाळींत—

**ताअी पोळ :** आणि मजुराच्या झोंपडींत—

**भाअी टोळ :** आम्हां दोघांचीं नांवं नेहरू–नायडूंच्याच नांवांअितकीं पूज्य आहेत. ( पिलोबाकडे बोट करून ) शंका येत असेल तर पिलोबांना विचारा या !

**पिलोबा :** हे भाअी दिगंबर टोळ, आणि या–या—

**भाअी टोळ :** या ताअी पद्मा पोळ. मी अखिल भारतीय टांगेवाला यूनियनचा अध्यक्ष, सलूनवाले संघाचा अुपाध्यक्ष, आचारी–वाढपे यूनियनचा खजिनदार, आणि बैलगाडी–खटारेवाले संघाचा चिटणीस आहें. आणि या—

**ताअी पोळ :** मी मंडअींतल्या भाजीवाल्या–पाटीवाल्या यूनियनची अध्यक्ष असून—

**भाअी टोळ :** तुळशीबागेंतल्या वाती वळणाऱ्या विधवा यूनियनच्या या चिटणीस आहेत.

**गोवर्धन :** काय म्हणतां ! वा ! आज खरोखरीच मी धन्य झालों ! मी न बोलावतां तुम्हीं माझ्या घरीं आलांत आणि साऱ्या गांवच्या बोळांतली अन् गल्लींतली पायधूळ तुम्हीं माझ्या दिवाणखान्यांत झाडलींत याबद्दल मी तुमचा फार आभारी आहें ! काय रे बलदेव, तुमच्या चाळींतल्या भाडोत्री लोकांच्या साऱ्या तक्रारी माझ्यापुढं मांडायला तूं अेकटा असमर्थ आहेस म्हणून का या दोन अखिल भारतीय महत्त्वाच्या विभूतींना अिथं येण्याची तसदी दिलीस ?

**बलदेव :** मी कशाला यांना आणतोंय् ! हेच आपण होऊन माझ्याबरोबर आले ! चाळींतल्या साऱ्या भाडेकऱ्यांचा यूनियन स्थापन करा म्हणून कित्येक दिवस माझ्यामागं लागले आहेत !

**भाअी टोळ :** आणि हे सारे भाडेकरी लोक असे बेवकूब आहेत, कीं यूनियन स्थापन करण्याची अक्कल अजून यांच्या बथ्थड टाळक्यांत येत नाहीं! अजून विचार करा! जोंपर्यंत तुम्हीं भाडेकऱ्यांनीं आपला यूनियन स्थापन केला नाहीं, तोंपर्यंत तुम्ही लोक या मगरूर मालकांच्या कितीहि कानींकपाळीं ओरडलांत तरी त्याचा काहीं अेक अुपयोग व्हावयाचा नाहीं! मघांपासून तुम्ही यांच्यापुढं येअून अेवढा घसा फोडत आहांत–बघा–यांच्या काळजाच्या खडकांत अेवढासा तरी ओलावा उत्पन्न झाला आहे का? म्युनिसिपालिटीच्या नळाला अेक वेळ दुपारीं पाणी येईल, पण या श्रीमंत मालकांच्या अंतःकरणांत दयेचा पाझर फुटायचा नाहीं!–म्हणून म्हणतों, कीं संघ स्थापा–अेकमुखानं आपल्या हक्कांची मागणी करा–तेवढ्यानं हे लोक ताळ्यावर आले नाहींत तर संप पुकारा! या श्रीमंत लोकांना वठणीवर आणण्याचं अेकच अमोघ शस्त्र म्हणजे संप! हे श्रीमंत लोक–हे भांडवलवाले लोक–गरिबांच्या पैशावर–गरिबांच्या कष्टानं कमाविलेल्या संपत्तीवर मोकाट चरणारे पोळ आहेत–गरिबांचं रक्त पिऊन माजलेले ढेकूण आहेत–गरिबांचे प्राण शोषणाऱ्या या जळवा आहेत–हजारों वर्षं समाजांतील अडाणी कामकऱ्यांची–कष्टाळू शेतकऱ्यांची आणि श्रमजीवी गरिबांची राक्षसी भांडवलशाहीनं जी भयंकर पिळणूक चालविलेली आहे–जी–जी पिळणूक चालविलेली आहे—

**गोवर्धन :** अहो मेहेरबान पिळणूक! घसा कोरडा पडला तुमचा–पिलोबा, आंतून चहाचा अेक कप घेऊन ये—

[ पिलोबा जातो.

**भाअी टोळ :** आणि अेक पिवळा हत्ती—

**गोवर्धन :** हो—अेक पिवळा हत्ती! बसा खालीं! फारच घामाघूम झालांत तुम्ही! तुमचं सारं भांडवल तुम्हीं अिथंच खर्च केल्यावर संध्याकाळीं शनवारवाड्यापुढं तुम्ही काय किंचाळणार!

**बलदेव :** संघ स्थापा नि संप करा असं सांगून तुम्हीं पुढारी लोक आम्हां गरिबांची निव्वळ दिशाभूल करीत आहांत! परवां भांडी–कामगार लोकांनीं तुमच्याच चिथावणीला बळी पडून संप पुकारला, त्याचं काय झालं! कामाचे तास कमी झाले नाहींत कीं रोजंदारीच्या दरांत वाढ झाली नाहीं! अखेर तोंड धुळींत खुपसून कारखानदारांना शरण जावं लागलं! तुम्ही संपाचे पुढारी राहतां बाजूला–

तुम्हांला कीर्ति मिळते–तुमचं नांव वर्तमानपत्रांत छापून येतं आणि संपावर जाणाऱ्या कामकऱ्यांची आणि त्यांच्या कुटुंबाची मात्र अन्नान्न दशा होते—

**भाऔ टोळ :** कुठल्या तरी गांधीछाप कॉंग्रेवाल्यानं तुम्हांला गुरुमंत्र दिल्यासारखा दिसतो आहे. आतांपर्यंत मीं सोळा संप यशस्वी करून दाखविले आहेत ! माझं नांव अैकलं, कीं भांडवलवाले अन् गिरणीवाले चळचळ कापूं लागतात. परवां मीं स्टेशनवरच्या हमालांचा संप पुकारला तर फर्स्ट क्लास अन् सेकंड क्लासमधल्या लोकांना ट्रंका न् बोचकीं आपापल्या टाळक्यावर घेअून रखडत जावं लागलं—पुढील आठवड्यांत मी गांवांतल्या साऱ्या न्हाव्यांचा संप पुकारणार आहें—त्याच्या आधीं तुम्हांला काय आपल्या हजामती करून घ्यायाच्या असतील त्या घ्या—

[ पिलोबा चहा व फराळाचें सामान घेअून येतो.

**गोवर्धन :** घ्या—संपसम्राट् ! हा चहा घ्या आधीं—

**भाऔ टोळ :** संपाचं नांव काढलं, कीं अंगावर रोमांच अुभे राहातात. तो पहा गिरणीचा भोंगा वाजला–हजारों मजूर गिरणीच्या दाराशीं जमले आहेत—अेकहि कामावर जायला तयार नाहीं–तो पहा लालबावटा–ती हातोडी आणि कोयता–तो अिन्किलाब झिंदाबाद—त्या अुघड्या मैदानांतल्या प्रचंड सभा–तो लाठीमार–तो गोळीबार—चार मजूर मेले, शंभर जखमी झाले—ते मेलेल्या मजुरांचं प्रचंड स्मारक—

**गोवर्धन :** बस करा हें संपपुराण—का बांधूं तुमचं स्मारक अिथल्या अिथं !

**भाऔ टोळ :** अच्छा—घेतों चहा—हें फराळाचं काय आणलं आहेत ?

**गोवर्धन :** दिवाळीचं आहे—आज भाअूबीज ! माहीत आहे ना ? काय हो ताऔ–तुम्हीं यांना सांगितलं नाहीं वाटतं ?

**भाऔ टोळ :** या आमच्या तसल्या–म्हणजे ओवाळणीवाल्या ताऔ नाहींत अं ! गैरसमज करून घेअूं नका ! आम्ही जसे अखंड भाऔ—तशा या अखंड ताऔ आहेत ! दसरा नि दिवाळी हे भांडवलवाल्यांचे नि मध्ययुगीन सरंजामदारांचे सण आहेत ! आम्ही ते पाळीत नसतों !

**गोवर्धन :** नका पाळूं सण, पण हें तर खातां ना ? ( बलदेव वगैरे मंडळींना ) हें घेत नाहीं ?

**बलदेव :** घरीं पोरंबाळं अुपाशी टाकून आम्ही आलों आहोंत तें कांहीं आपल्या फराळावर ताव मारण्यासाठीं नाहीं–

**भाअी टोळ :** हें–हें चूक आहे ! या भांडवलवाल्या श्रीमंतांच्या घरीं जेवढं कांहीं मिळेल तेवढं फस्त करून त्यांना आपण लुबाडलं पाहिजे. हा चहा–हा काय या श्रीमंतांचा आहे ? गरिबांच्या कष्टानंच तयार झालेला आहे हा ! या चकल्या, या करंज्या–गरीब बिचाऱ्या स्वयंपाक्यांनीं आणि मोलकरणींनीं राबराबून तयार केलेल्या आहेत ! हा सारा माल आपल्या गरिबांचाच आहे ! म्हणून तो आपण गरिबांनीं खायला कांहीं हरकत नाहीं.

**बलदेव :** बस करा तुमची अक्कल ! ( गोवर्धनला ) हें पहा साहेब, मला आपल्याला जास्ती कांहीं सांगायचं नाहीं. म्युनिसिपालिटीची निवडणूक जवळ आली आहे. तुम्ही दर वेळेप्रमाणं आमच्या मतांवर अवलंबून रहाल; पण तुम्हांला साऱ्या भाडेकऱ्यांतर्फे निक्षून सांगतों, कीं आठ दिवसांच्या आंत आमच्या साऱ्या तक्रारी दूर झाल्या नाहींत तर या निवडणुकींत अेक मत मिळणार नाहीं तुम्हांला आमच्यापैकीं !

**गोवर्धन :** तुमच्या असल्या पोकळ धमक्यांना भीक घालणार नाहीं मी ! आज बारा वर्षं निवडून येतों आहें मी म्युनिसिपालिटींत ! तुमचीं श्राद्धं जेवून बसलों आहें मी ! भिकारड्या भाडेकऱ्यांची मला मिजास सांगतां ! पांच रुपायाची नोट दाखविली कीं, पोटावर फरपटत येतील सारे मतं द्यायला !–चला चालते व्हा ! कांहीं अेक दुरुस्ती होणार नाहीं चाळीची ! राहायचं असेल तर राहा, नाहीं तर खुशाल चाळ सोडून देशोधडीला जा !

**बलदेव :** अस्सं ! आमच्या कांहीं अेक तक्रारी अैकणार नाहीं तुम्ही ? मग यापुढं एक पै भाडं मिळणार नाहीं तुम्हांला आमच्याकडून ! मग बघूं देशोधडीला कोण जातंय तें ! चला रे !

[ बलदेव नि अितर जातात.

**भाअी टोळ :** गद्धा आहे लेकाचा ! म्हणजे आतांपर्यंत मी त्याला हेंच सांगतों आहे––कीं संप करा–भाडं देअूं नका–त्याशिवाय तुमच्यासारख्या बदमाष मालकांचे डोळे अुघडाचे नाहींत ! तर कोणी अेक अैकायला तयार नव्हता ! आणि आतां शेवटीं माझ्याच तत्त्वावर आले !

**गोवर्धन :** काय बेवकूब आहांत ! अक्कल, बुद्धि, शहाणपणा यांनीं संप केला आहे काय तुमच्या डोक्यांत ! खुशाल माझ्या भाडेकऱ्यांना माझ्यासमोर संप

करायला सांगतां आहांत ? ( ताअी पोळ अेकदम हुंदके देअूं लागते. ) अं ! हें हो काय ? झालं काय यांना ! चांगल्या चहा पितां पितां सुखासुखी हुंदके द्यायला लागतात !

**भाअी टोळ :** तसं त्यांना होतं नेहमीं ! चहा पितांना, खातांना, जेवतांना त्यांना अस्सं रडूं येतं !

**गोवर्धन :** तें कां ?

**भाअी टोळ :** चहाच्या प्रत्येक घोटाबरोबर आणि अन्नाच्या प्रत्येक घासाबरोबर त्यांना आपल्या स्वराज्याची आठवण होते. आपण अिकडे खावं प्यावं—चैन करावी आणि अजून आपला देश गुलामगिरींत खितपत पडावा या कल्पनेनं कोणाचा गळा भरून येणार नाहीं ?

[ तोहि डोळे पुसतो.

**गोवर्धन :** हें पहा मेहेरबान ताअी आणि भाअी, तुम्हां दोघांना रडायचं असेल तर बाहेर व्हा ! नाही तर तिकडे न्हाणीघरांत जा आणि अेकमेकांला मिठ्या मारून पोटभर रडा ! पिलोबा, त्यांना अेक टॉवेल आणून द्या.

**भाअी टोळ :** तुम्हां भांडवलवाल्या लोकांना काळीज, अंतःकरण, भावना, देशाभिमान वगैरे कांहीं आहे का ? बरं, तें जाअूं द्या ! मी आलों होतों तें अशासाठीं—( खिशांतून कागद काढतो. )—या पत्रकावर तुमची सही पाहिजे...

**गोवर्धन :** ही काय भानगड आहे ?

**भाअी टोळ :** दोन महिन्यांपूर्वी तुम्हीं म्युनिसिपालिटींतल्या लोकांनी सायकलवर कर बसवून गरीब जनतेवर भयंकर अन्याय केला आहे !

**गोवर्धन :** मींच तो ठराव म्युनिसिपालिटींत आणला—

**भाअी टोळ :** म्हणूनच तुमच्या नांवानं गांवांत लोक ठणाणा करीत आहेत ! सायकलवर कर बसवल्यापासून गांवांत हलकल्लोळ अुडाला आहे ! गरीब लोक आपापल्या सायकली भराभर विकून टाकूं लागले आहेत. आमचीच गोष्ट पहा ! पूर्वी आम्हां दोघांजवळ दोन सायकली होत्या ! पण कर बसल्यापासून माझी सायकल मीं काढून टाकली ! हल्लीं यांच्याच सायकलवर मी काम भागवतों आहें.

**गोवर्धन :** छान ! ही चांगली युक्ति काढलीत—म्हणजे कराचं ओझं आपलं यांच्यावरच पडलं !

**भाऔी टोळ :** आज तुम्हीं सायकलीवर कर बसवलांत, अुद्यां तुम्ही जोड्यावर कर बसवाल–परवां पगडीवर बसवाल–तेरवां डोक्यावरच्या टकलावर किंवा कानावरच्या केसांवर कर बसवाल ! काय म्युनिसिपालिटी आहे का चेष्टा आहे ? नशिब आमचं ! गांवांतल्या सुंदर मुलींवर तुम्हीं कर बसविला नाहीं !

**गोवर्धन :** फायदा काय ! सुंदर मुलींवर कर बसवला तर या गांवांत कवडीचंहि अुत्पन्न होणार नाहीं ! बरं मग, म्हणणं काय आहे तुमचं ?

**भाऔी टोळ :** तुम्ही म्युनिसिपालिटीच्या येत्या निवडणुकींत जर अुभे राहणार असाल आणि जर तुम्हांला निवडून यायचं असेल तर या पत्रकावर सही करून सायकल-कर रद्द करण्याच्या आमच्या या चळवळींत तुम्ही समील व्हायला पाहिजे. तरच आमच्या साऱ्या यूनिअनचा तुम्हाला या निवडणुकींत पाठिंबा मिळेल !

**गोवर्धन :** तुमचें यूनियन म्हणजे तें खटारेवाले अन् सल्लूनवाले यूनियन कीं नाहीं ! ( तें पत्रक फाडतो. ) हा तुमच्या चळवळीला माझा पाठिंबा ! सायकलवर कर बसविण्यासाठीं जिथं मीं स्वतः पुढाकार घेतला तिथं तो कर रद्द करण्याच्या चळवळींत मी सामील होअूं !

**आभी टोळ :** मग तुम्ही कसे निवडून येतां तें आम्ही पाहतों ! साऱ्या सायकलवाल्यांचा प्रचंड संप घडवून आणूं ! शहरांतले सारे व्यवहार बंद पाडूं ! एवढंच काय पण अखिल जागतिक सायकल संघ स्थापन करून या सायकल–संपाचा वणवा आम्ही साऱ्या जगांत पसरवूं आणि प्रचंड क्रांति घडवून आणूं—

**गोवर्धन :** हें पहा, संप करायच्या अैवजीं शखं करा जा दोन्ही हातांनीं ! तुमच्या सारखे टिनपाट भाऔी नि ताऔी असे चहाच्या कपावर अन् पिवळ्या हत्तीच्या पाकिटावर विकत मिळतात ! संपाच्या गप्पा तुम्ही या ताऔीच्या पुढं मारा–आणि काय क्रांति करायची असेल ती त्यांच्यांतच करा ! चला, मुकाट्यानं रस्ता सुधारतां का तुमच्या मानगुटीवर बसवूं हा कर ?

**भाऔी टोळ :** दूर–हात लावूं नका अंगाला–आम्ही भांडवलवाल्यांना शिवत नसतो–चल ग—

[ दोघें घाऔीघाऔीनें निघून जातात. गोवर्धन कोचावर बसतात. अितक्यांत गिरिजा आंतून येते.

**गिरिजा :** काय करावं या प्रमोदला ?

**गोवर्धन :** काय झालं ?

**गिरिजा :** आज भाऊबीज–अजून याचा पत्ता नाहीं ! ( थांबून ) कोण मंडळी आली होती आतां ? कसल्या गप्पा चालल्या होत्या एवढ्या ? ( थांबून ) ठरलं नाहीं ना अजून कांहीं ?

**गोवर्धन :** कशाचं म्हणतेस ?

**गिरिजा :** म्युनिसिपालिटीचं हो ? नाहीं राहणार ना यंदा अुभे ? ( लाडिकपणें ) खरंच, नाहीं ना अुभे राहाणार ?

**गोवर्धन :** मी म्युनिसिपालिटीच्या निवडणुकीला अुभा राहीन किंवा राहणार नाहीं ! तुला या भानगडींत डोकं घालण्याचं काय कारण आहे ? बायकामाणसांनीं स्वयंपाकघरांतल्या गोष्टीकडे लक्ष पुरवावं ! भाजी घोसाळ्याची करायची का पडवळाची करायची–लोणचं लिंबाचं घालायचं का आंब्याचं घालायचं—

**गिरिजा :** तर तर–स्वयंपाकघरांत लक्ष घालतें मी ! तो काळ गेला आतां बरं का ! आजपर्यंत बायकांनीं आपल्याला स्वयंपाकघरांत कोंडून घेतलं म्हणून पुरुषांना दिवाणखान्यांत वाटेल तें करायला मोकळीक मिळत होती. आतां आम्ही तुमचं कांहीं अेक अैकणार नाहीं. काय वाटेल तें झालं तरी यंदा तुम्हाला मी म्युनिसिपालिटीला अुभे राहूं देणार नाहीं !

**गोवर्धन :** अस्सं ! मग काय वाटेल तें झालं तरी मी म्युनिसिपालिटीला अुभा राहणार ! तूं कोण मला सांगणार ?

**गिरिजा :** मी–मी तुमची बायको–आणि म्युनिसिपालिटीची एक मतदार पण ! दोन्ही नात्यांनीं तुम्हांला बजावतें, कीं तुम्ही यंदा अुभे राहतां कामा नये–तुम्ही रहा तर खरें अुभे !

**गोवर्धन :** नवीन आतां काय अुभं राहायचं आहे ? गेलीं बारा वर्षं मी अेकसारखा अुभाच आहे ! त्याशिवाय का मी म्युनिसिपालिटींत निवडून येतों आहे ? जोंपर्यंत मी आडवा झालों नाहीं तोंपर्यंत प्रत्येक निवडणुकीला मी अुभाच आहें !

**गिरिजा :** बारा वर्षं तुम्ही म्युनिसिपालिटींत निवडून येतां आहांत–अजून तुम्हांला म्युनिसिपालिटीचा कसा कंटाळा आला नाहीं ? आपल्या लग्नाला अजून बारा वर्षं झालीं नाहींत तोंच संसाराचा मात्र तुम्हांला कंटाळा आला ! रोज रोज त्याच त्याच म्युनिसिपालिटीच्या गोष्टी अैकून आम्हांला–घरांतल्या माणसांना त्या म्युनिसिपालिटीचा अगदीं वीट आला आहे–आणि तुम्हांला तिथं जाऊन बसण्याचा कसा तिटकारा वाटत नाहीं ?

**गोवर्धन** : अडाणी स्त्रिये, म्युनिसिपालिटींत जाण्याचा माणासाला कां कंटाळा येत नाहीं, हें रहस्य तुला या जन्मांत कळणं शक्य नाहीं ! म्युनिसिपालिटी हा अेक नाद आहे–म्युनिसिपालिटी हें अेक वेड आहे–म्युनिसिपालिटी हें अेक व्यसन आहे ! जो म्युनिसिपालिटींत अेकदां गेला तो कायमचा गेला–बाहेरच्या जगाला कायमचा अंतरला ! अेखाद्या गांजेकसाला गांजाची चिलीम ओढायला मिळाली नाहीं किंवा दारूबाजाला संध्याकाळीं दारू प्यायला मिळाली नाहीं, म्हणजे त्याची जशी बेचैन स्थिति होते तशी म्युनिसिपालिटीची सभा ज्या दिवशीं नसेल त्या दिवशीं आमची केविलवाणी अवस्था होते ! आमच्यांतले कांहीं अट्टल सभासद –काम असो अगर नसो–म्युनिसिपालिटींत चोवीस तास ठेल पडून असतात, तें काय उगीच ? तें कांहीं नाहीं–या आयुष्यांत आपली ही म्युनिसिपालिटी आतां सुटायची नाहीं–आशाच करूं नकोस ! यंदाहि आपण सालाबादप्रमाणं अुभे राहणार !

**गिरिजा** : तुम्ही अुभे राहिलांत तर मी सत्याग्रह करीन–प्राणांतिक अुपोषण करीन ! साऱ्या गांवांत ओरडत फिरेन, कीं यांना मतं देअूं नका–म्युनिसिपालिटींत जाअून यांनीं आपल्या संसाराचा सत्यनाश केला आहे म्हणून ! सगळ्या गांवानं जरी तुम्हांलीं मतं दिलीं तरी माझ्या अेकटीचं मत तरी मी तुम्हांला देणार नाहीं !

**गोवर्धन** : बायकोच्या मताची कोणताहि पुरुष कधींहि पर्वा करीत नाही–मग तें मत म्युनिसिपालिटीचं असो अगर घरांतलं असो. पण मी म्हणतों तुझा अेवढा म्युनिसिपालिटीवर कां राग ? म्युनिसिपालिटी का तुझी सवत आहे ?

**गिरिजा** : म्युनिसिपालिटी ही माझी सवतच आहे–माझ्या संसारांतलं सारं सुख हिरावून नेणारी–माझ्या मुळावर आलेली ती सवतच नाहीं तर कोण आहे !

सवत जिवा ही जाळी !
नाश करी मम संसाराचा,
नेअि हिरावुनि नाथचरणा !
शांत सुखाचा । हंसत मुखाचा
बोल निघे ना । प्रेमें त्यांचा !
ध्यास तिचा हृदया जडला !

या कैदाशिणीच्या नादामुळं तुमचं संसारांतलं सारं लक्ष पार पार अुडून गेलं आहे –क्षणभर कधीं शांतपणें घरांत बसाल–आपल्या बायका मुलांना जवळ घेअून त्यांच्याशीं प्रेमानं गोष्टी कराल तर शपथ ! अष्टौप्रहर तुमचं म्युनिसिपालिटीशीं लग्नच लागलं आहे ! आज या बोर्डाची सभा आहे–अुद्यां त्या कमिटीची सभा आहे–आज ड्रेनेज पाहायला जायचंय्, अुद्यां शेतखाना तपासायला जायचंय्–आज भाजी–मार्केट तर अुद्यां मटन–मार्केट ! रात्रीं झोपेंतसुद्धां मनाला स्वस्थता आहे का ? 'पोल–पोल–पोल' असें किंचाळत नि ओरडत अुठतां ! सुट्टी असो अगर नसो घरांत चतुरशिंगीची जत्रा भरलेली असते रोज ! कुठले कोण बिगारी, मुकादम, झाडूवाले, भंगी–ज्यांचीं तोंडं पाहायला नकोत कधीं–त्यांचं आपलं रोज सकाळीं नियमानं दर्शन ! नको–नको झालं आहे मला या घरांत राहणं ! म्युनिसिपालिटींत जाअून तुम्हीं आपल्या संसाराचं अन् घरादाराचं वाटोळं केलं आहेत !

**गोवर्धन :** महामूर्ख आहेस ! म्हणे म्युनिसिपालिटींत जाअून मी घरादाराचं वाटोळं केलं ! तुला काय त्यांतलं कळतं ! मी इतकीं वर्षे म्युनिसिपालिटींत आहे म्हणून मी या स्थितीला येअून पोहोंचलों आहे, ठाअूक आहे ? दहा दहा हजार रुपये खर्च करून आम्ही म्युनिसिपालिटींत निवडून जातों तें काय आमच्या घरादाराचं वाटोळं करण्यासाठीं ? म्युनिसिपालिटी-सारखा किफायतशीर धंदा नाहीं दुसरा. निवडणुकींत खर्च केलेलं सारं भांडवल दामदुप्पटीनं तीन वर्षांत हमखास परत आलंच पाहिजे ! त्याशिवाय आपला मानसन्मान होतो–समाजांत वजन वाढतं, हे फायदे तर निराळेच !– आमच्या म्युनिसिपालिटीचे असे कित्येक सभासद दाखवून देअीन, कीं ज्यांना म्युनिसिपालिटीशिवाय अुपजीविकेचं साधनच नाहीं मुळीं ! या लोकांचं चालतं कसं ? म्हणे म्युनिसिपालिटींत जाअुन घरादाराचं वाटोळं होतं !

**गिरिजा :** या म्युनिसिपालिटीचं वाटोळं झाल्याशिवाय तुमच्या लोकांचं म्युनिसिपालिटीचं वेड कांहीं कमी व्हायचं नाहीं ! नाहीं तर ही म्युनिसिपालिटी बंद तरी पडली पाहिजे ! खरंच, सरकारनं साऱ्या म्युनिसिपालिट्या बंद केल्या तर किती तरी संसारी बायकांचा सरकारला दुवा मिळेल !

**गोवर्धन :** सरकार तर ही म्युनिसिपालिटी बंद करायला डोळ्यांत तेल घालून बसलं आहे. तुम्हां बायकांचा आणखी सरकारला पाठिंबा नको. ही म्युनिसिपालिटी जर सरकारनं बंद केली तर निम्या सभासदांना वेड लागेल; अन् त्यांना वेड्याच्या अिस्पितळांत पाठवावं लागेल आणि निम्या सभासदांना

अुपजीविकेचं साधन नाहीं म्हणून अनाथ-पंगु गृहांत पाठवावं लागेल. म्युनिसिपालिटी बंद झाली तर आमचं चालणार कसं ?

**गिरिजा :** देवाच्या दयेनं आपल्याला भरपूर दिलेलं आहे. आपला चरितार्थ चालविण्यासाठीं तरी आपल्याला म्युनिसिपालिटींत जायला नको.

**गोवर्धन :** तें तुला नाहीं कळायचं ! गेल्या बारा वर्षांत म्युनिसिपालिटींत जाअून मीं जे जे फायदे करून घेतले, ते ते पुरते पचवण्यासाठीं मला फिरून म्युनिसिपालिटींत गेलंच पाहिजे. आतां आपली चाळ पहा ! महिना सहाशें रुपये भाडं येतं तिचं ! गेल्या कित्येक वर्षांत आपण दुरुस्ती केली आहे तिची ? मी म्युनिसिपालिटींत नसतों तर कोणी पास केली असती ती ? मनुष्यवस्तीस अयोग्य म्हणून म्युनिसिपालिटीनं तिला केव्हांच जमीनदोस्त करून टाकली असती. परवां शिवाजी रोडवर आपण तो प्लॉट विकत घेतला. पांच रुपये स्क्रेअर फुटाची जागा ती. भर वस्तींतली. पण आपल्याला ती चार आणे स्क्रेअर फुटानें मिळाली. मी म्युनिसिपालिटींत नसतों तर मिळाली असती का कधीं ? आपलं तें पडकं घर ! पांचशें रुपये कोणी दिले नसते त्याला ! पण लक्ष्मी रोडची आंखणी करतांना तें नेमकं मधोमध आणून त्याचे दहा हजार रुपये कॉम्पेन्सेशन ठोकून घेतलं ! घरपट्टी अन् नळपट्टी दिल्याचं मला आठवतच नाहीं मुळीं ! आपली मोटार आहे-तिचा टॅक्स आपण कधीं दिला आहे ? गांवांतले लोक नि म्युनिसिपालिटींतील अधिकारी माझ्यावर असा डाव धरून बसले आहेत, कीं मी जर म्युनिसिपालिटींत फिरून निवडून गेलों नाहीं तर मला ह्या गांवांत राहणं ते अशक्य करतील ! अितकंच काय पण ज्या झाडूवाल्या रोज सकाळीं मला सलामी दतात त्याच मला आपल्या झाडूंनीं झोडपून काढायला मागंपुढं पाहायच्या नाहींत !

[ अितक्यांत नंदू बाहेरून नाचत येतो, मागून प्रमोद येतो.

**नंदू :** आअी, मामा आला-ही बघ मामानं मला खादीची टोपी आणली.

**गिरिजा :** ही वेळ यायची काय रे ? सकाळपासून मी तुझी वाट पाहातें आहें. म्हटलं आंघोळीला तरी येशील ! अेऱ्हवीं कांहीं कधीं तुमची भेट होत नाहीं. पण वर्षांतून अेकदां-भाअूबिजेच्या दिवशीं तरी तुमचं दर्शन घडतं ! पण आज तीहि आठवण नाहीं तुम्हांला ! कांहीं दोन-चार बहिणी देवानं दिल्या नाहींत ! अेकच आहे अेवढी, बरं का ?

**प्रमोद :** माफ कर ताअी, कॉंग्रेसनं या म्युनिसिपालटीच्या निवडणुका लढवण्याचं ठरवल्यापासून मला अेक क्षणाची देखील फुरसत नाहीं !

**गिरिजा :** म्हणजे ! कॉंग्रेस म्युनिसिपालिटींत जाणार कीं काय आतां ? झालं, म्हणजे निकाल लागला कॉंग्रेसचा ! ही कुठून अवदसा आठवली कॉंग्रेसला !

**गोवर्धन :** अहो, तुम्ही आतां आंत जा आणि भावाला ओवाळण्याची तयारी करा ! कॉंग्रेस नि फिंग्रेस तुम्हाला काय कळतंय् ?

**गिरिजा :** तर–तर, तें नका सांगू ! आम्ही बायका हल्लीं इतक्या कांहीं अडाणी राहिलों नाहींत ? अेक वेळ आम्हां बायकांना तुम्हां पुरुषांच्या भानगडी कळत नसतील, पण कॉंग्रेसचं राजकारण काय हें आम्हांला खडान् खडा माहीत आहे. आम्हांलाच काय पण कॉंग्रेस म्हणजे काय हें आजकाल नंदूसारखीं पोरं देखील सांगूं शकतील—

**नंदू :** हो–मी सांगतों कॉंग्रेस म्हणजे काय तें–कॉंग्रेस म्हणजे महात्मा की जय–जवाहरलाल नेहरू की जय–अन्–अन्–तें अिन्किलाब काय आहे तें नाहीं मला माहीत—

**प्रमोद :** अिन्किलाब झिंदाबाद !

**नंदू :** हो तेंच ! कॉंग्रेस म्हणजे अिन्किलाब झिंदाबाद !

[ नंदू आअीबरोबर नाचत नाचत जातो.

**गोवर्धन :** मीं तुला अशासाठीं बोलावलं होतं—

**प्रमोद :** आलं माझ्या ध्यानांत ! तुमचा अर्ज आला तेव्हांच मला कळलं ! कॉंग्रेस पार्लमेंटरी बोर्डाची सभा आतां चालूच आहे ! अेक तासाच्या आंत सारी यादी तयार होअील.

**गोवर्धन :** मग काय रंग दिसतो आहे ?—

**प्रमोद :** रंग-( अडखळत ) मला तर जरा कठीणच काम दिसतंय् !

**गोवर्धन :** छे–छे ! काय वाटेल तें झालं तरी मला कॉंग्रेसचं तिकीट मिळालंच पाहिजे–मला कॉंग्रेसचं तिकीट नाहीं म्हणजे काय ? म्युनिसिपालिटीच्या राजकारणांत बारा वर्षं मुरलेला माझ्याएवढा मुरब्बी कॉंग्रेसजवळ दुसरा कोण आहे ! आज कॉंग्रेस प्रथमच म्युनिसिपालिटींत शिरते आहे–लोकांना कॉंग्रेसबद्दल अद्याप विश्वास नाहीं. अशा वेळीं आमच्यासारख्यांच्याच मदतीनं कॉंग्रेसनं आपलं म्युनिसिपालिटींतलं राजकारण यशस्वी करून दाखवलं पाहिजे !

**प्रमोद** : तें सारं खरं–पण आमच्या हायकमांडची अेकंदर अशी पॉलिसी दिसते आहे, कीं जुन्या म्युनिसिपालिटीच्या बजबजपुरींत ज्यांचं नांव बदनाम झालं आहे–मग तें कांहींहि कारणामुळं असो–अशांना कांहीं झालें तरी कॉंग्रेस–तिकीट द्यायचं नाहीं. आज आम्हांला म्युनिसिपालिटीची आमूलाग्र सुधारणा करायची आहे. अशा वेळीं कॉंग्रेसच्या ध्येयावर व कार्यावर विश्वास असलेले तरुण, अुत्साही आणि होतकरू लोक आम्हांला म्युनिसिपालिटींत पाठवायचे आहेत.

नवयुगाचा हा चौघडा,
अुठवि पहा या नवभारताला,
स्फुरवित नवतरुणाला !
तळपत हा रवि–स्वातंत्र्याचा !
अुगवत काळ आज तरुणांचा !
दिपवित जगास या काला !

**गोवर्धन** : छट्–तरुण लोकांचं म्युनिसिपालिटींत काय काम आहे ? लग्न लावायचंय काय तिथं ? आणि तसं पाहिलं तर उत्तम संसार चालवायला किंवा म्युनिसिपालिटीचा अुत्तम कारभार चालवायला होतकरू प्रथमवरापेक्षां चांगले अनुभवी बिजवर अन् तिजवरच जास्त लायक असतात !

**प्रमोद** : दुसरी गोष्ट अशी–बोलूं का–राग येणार नाहीं ना–तुमच्याविषयीं गांवांत भलभलत्या अफवा न् कंड्या आहेत—

**गोवर्धन** : माझ्याविषयीं !–कंड्या ! त्या कसल्या ?

**प्रमोद** : अनेक आहेत–खाजगी नीतिमत्तेबद्दल म्हणा किंवा सार्वजनिक चारित्र्याबद्दल म्हणा–हायकमांडजवळ पुष्कळ पुरावा आहे त्याबाबत ! ते म्हणतात तुम्हांला तिकीट दिलं तर कॉंग्रेसला म्युनिसिपालिटींत जायला तोंड राहायचं नाहीं.

**गोवर्धन** : अरे वारे वा हायकमांड ! मला नितिमत्तेच्या गोष्टी सांगताहेत ! माझी नीति खराब अन् यांची नीति तेवढी सनलाअिट साबूनं धुतलेली होय ! काय

पुरावा आहे हायकमांडजवळ माझ्याविरुद्ध ? अन् यांच्याविरुद्ध मजजवळ पुरावा आहे तो काढूं का बाहेर ! आमचं 'दुष्काळ' पत्र अेका पायावर छापायला तयार आहे. खादीचे अंग्रे अंगावर चढवले आणि बावळट चेहरा करून सत्य आणि अहिंसेच्या गप्पा मारल्या म्हणजे तो तेवढा शुद्ध चारित्र्याचा कॉंग्रेसवाला अन् बाकीचे सारे बदफैली काय ? तूं माझा मेव्हणा आहेस—माझं चारित्र्य काय तें तुला ठाअूक आहे—तुझ्या बहिणीला ठाअूक आहे ! तूं जाअून सांग त्या लोकांना—त्यांची खात्री करून दे—

**प्रमोद** : मला जेवढं कांहीं करतां येण्यासारखं आहे तेवढं मी पक्कं करून आलों आहे; तुमच्याबद्दल अितकं विरोधी वातावरण असूनहि बहुतेक तुम्हांला तिकीट मिळेल असं वाटतं—

**गोवर्धन** : तसं झालं तरच कॉंग्रेसची अिज्जत राखली जाणार आहे. ज्यांना निवडणुकीचा अनुभव नाहीं अशा नवख्या लोकांना तिकीट देअून कॉंग्रेसचं म्युनिसिपालिटींत बहुमत होअील होय ! निवडणुकीची विद्या फार निराळी आहे—तिच्यांत जो रुळला असेल तोच निवडून यायचा. कॉंग्रेसच्या तिकिटावर वाटेल तो अुडाणटप्पू निवडून येअील असं जर तुम्हांला वाटत असेल तर तो निव्वळ भ्रम आहे. आलोंच मी त्या पितांबर वकिलाला टेलिफोन करून. त्याला कॉंग्रेस हाअुसमधें पाठवून देतों. त्याची अन् तुमच्या हायकमांडवाल्यांची चांगली दोस्ती आहे.

[ जातो. प्रमोद अिकडे तिकडे फिरतो.

**प्रमोद** : अरे नंदू—

[ गिरिजा येते.

**गिरिजा** : मघांशीं विचारायचं विसरलं—कॉंग्रेस म्युनिसिपालिटींत जाणार म्हणून सांगितलंस—म्हणजे तूं आतां म्युनिसिपालिटींत जाणार कीं काय ?

**प्रमोद** : बहुतेक-कॉंग्रेसचा हुकूम झाला तर मला म्युनिसिपालिटींतच काय—पण स्मशानांत देखील जावं लागेल.

**गिरिजा** : मग स्मशानांत जा—पण म्युनिसिपालिटींत जाअूं नकोस, पाया पडतें तुझ्या मी ! आतांशी कुठं तुझ्या आयुष्याला सुरुवात झाली आहे—आणि आतां तर तुझं लग्न व्हायचं आहे ! माझं अैकायचं असेल तर तुझा सगळा संसार सुखानं पुरा होअूं दे—मग म्हातारपणीं संन्यास घे आणि हवं तर म्युनिसिपालिटींत जा—

**प्रमोद :** माझ्यापेक्षां त्यांना—दाजीसाहेबांना हा अुपदेश केला असतास आतांपर्यंत, तर फार बरं झालं असतं !

**गिरिजा :** त्यांना आतां सांगून का अुपयोग होणार आहे कांहीं ? अितकीं वर्षं मी त्यांच्या कानींकपाळीं ओरडतें आहें—अितक्यांत तूं यायच्यापूर्वी मीं अितका घसा फोडला त्यांच्यापुढं—पण कांहीं अर्थ नाहीं ! मी मेलें तरी यांचा म्युनिसिपालिटीचा नाद सुटायचा नाहीं. माझा पास आणायला म्हणून म्युनिसिपालिटींत जातील आणि वर जनरल बॉडीच्या सभेंत जाअून बसतील ! मला कळत नाहीं म्युनिसिपालिटींत यांचा जीव कां अडकला आहे अेवढा !

**प्रमोद :** त्याचं सांगूं—गोऱ्या लोकांनीं आपल्या देशांत पुष्कळशा चांगल्या गोष्टी आणल्या—शास्त्रं आणलीं, विद्या आणल्या, सुधारणा आणल्या तर त्याबरोबर त्यांनीं नवीन व्यसनंहि आणलीं आणि रोगहि आणले ! स्वातंत्र्याच्या आणि समतेच्या नवीन नवीन कल्पना शिकवून त्यांनींच देशांत राष्ट्रीयत्वाची भावना निर्माण केली आाण म्युनिसिपालिट्या, लोकल बोर्ड आणि कौन्सिलं हीं लोकशाहीचीं दिखाअू, विलायती खेळणीं अडाणी जनतेच्या हातांत देअून त्यांनींच राष्ट्रांत बुद्धिभेद निर्माण केला. हजारों वर्षं राजाची देवाप्रमाणं पूजा करीत असलेल्या या देवभोळ्या देशांत जनताजनार्दनाची पूजा करण्याचे निर्माण झालेले हे नवीन प्रकार, अितक्या लवकर जनतेला मानवण्यासारखे नाहींत—म्हणून म्युनिसिपालिट्यांत आणि लोकल बोर्डांत पांचामुखीं परमेश्वराच्या पूजेपेक्षां, त्या देवाच्या नांवावर स्वतःला विकणाऱ्या स्वार्थी, ढोंगी आणि बदमाष पंड्यांचा आजकाल फार वडेजाव माजलेला आहे.

स्वार्थ आज जगीं भरला,
कुणि न लोकां वालि अुरला !
दिसति दांभिक वरुनि बगळे,
स्वहितसाधू आंत सगळे !
जनहिताचा नाश झाला !

लोकशाहीची बदनामी करणाऱ्या या पुंडांना म्युनिसिपालिटींतून हांकून देअून खऱ्या लोकशाहीचा कारभार प्रस्थापित करण्यासाठीं कॉंग्रेस आज म्युनिसिपालिटींत जाअूं अिच्छित आहे !

**गिरजा** : काँग्रेस म्युनिसिपालिटींत गेली म्हणून यांचं म्युनिसिपालिटींत जाण्याचं वेड कसं थांबणार ? बारा वर्षांची ही व्यथा आहे त्यांची ! तिसऱ्या अवस्थेंत रोग गेला आतां !

**प्रमोद** : कुठल्याहि अवस्थेंत रोग जाऊं दे ! काँग्रेसच्या मलमपट्टीनं तो ताळ्यावर आलाच पाहिजे-- ( हंसून हलकेंच ) सगळ्यांत गमतीची गोष्ट म्हणजे काँग्रेसचं तिकीट मिळावं म्हणून दाजीसाहेबांनीं यंदा जारीनं खटपट चालवली आहे—मधांशीं मला त्याबद्दलच गळ घालीत होते--

**गिरजा** : अन् मग ?

**प्रमोद** : पाहूं काय होईल तें ! निवडणूक-मंडळाची सभा चालू आहे आतां !

**गिरजा** : आणि तूं इथं ! जा बाबा, पळ–नाहीं तर काँग्रेस यांना तिकीट देऊन टाकील आणि काँग्रेसनं यांना तिकीट दिलं म्हणजे मग मला थेट स्वर्गाचं तिकीट काढावं लागेल ! हंसतोस काय ? जा ना ! नाहीं तर आतांच्या आतां मला शेगांवला निघावं लागेल—महात्मा गांधींना भेटायला !

**प्रमोद** : तूं कांहीं काळजी करूं नकोस—अगदीं निर्धास्त राहा. सारं तुझ्या मनाप्रमाणं होईल.

**गिरजा** : तुझ्या तोंडांत साखर पडो ! प्रमोद, आज भाऊबिजेची मला दुसरी कांहीं ओवाळणी घातली नाहींस तरी चालेल; पण मी तुला हात जोडतें—मला एवढी एक ओवाळणी घाल—

**प्रमोद** : ती कोणती ?

**गिरजा** : काय वाटेल तें कर--यंदा यांना म्युनिसिपालिटींत जाऊं देऊं नकोस ! जन्माचे उपकार होतील तुझे माझ्यावर--

**प्रमोद** : मग सांगूं तुला ! अजून गुप्त आहे बरं कां हें ! काँग्रेस यांना तिकीट देणार तर नाहींच; पण जर हे स्वतंत्रपणें उभे राहिले तर या वॉर्डात यांच्याच विरुद्ध काँग्रेसनं मला उभं करायचं ठरवलं आहे ! आणि मी यांच्याविरुद्ध उभा राहिलों म्हणजे हे हटकून पडलेच पाहिजेत !

[ गिरजा आणि प्रमोद एकमेकांचे हात हातांत घेऊन मोठमोठ्यानें हंसतात. गोंवर्धन प्रवेश करतो.

**गोवर्धन** : वेड लागलंय् काय तुम्हां दोघांना ? केवढ्या मोठ्यानं हंसतां ! काँग्रेसचे लोक एवढ्या मोठ्यानं हंसतात हें मला माहीत नव्हतं ! कसल्या चालल्या होत्या गप्पा !

**गिरजा** : आम्ही तुमच्या म्युनिसिपालिटीसंबंधीं बोलत होतों.
**गोवर्धन** : मग त्यांत हंसण्यासारखं काय आहे ?
**गिरजा** : म्युनिसिपालिटीसंबंधीं—अन् हंसण्यासारखं ! कित्ती तरी आहे. ( नंदू आंतून हांक मारतो. ) आलें अं नंदू !

[ जातें.

**प्रमोद** : काय, केला फोन ?
**गोवर्धन** : दरिद्री आहे कॉंग्रेसहाअूस तुमचं ! तिथं टेलिफोन सुद्धां नाहीं ! पितांबर वकिलांना शेजारच्या पोलिसचौकीवरून फोन करावा लागला ! नव्याण्णव टक्के आपल्याला तिकीट मिळायलाच पाहिजे ! कांहीं झालं तरी यंदा आपण म्युनिसिपालिटींत निवडून येणार !

[ भीमाशंकर आणि चक्रदेव प्रवेश करतात.

**भीमाशंकर** : येणार म्हणजे काय आलाच पाहिजे ! आमच्या सोन्यामारुती-पक्षाचा यंदा तुम्हांला पूर्ण पाठिंबा आहे. अैकलंत चक्रदेव, झालं आतां समाधान ? मी तुम्हांला पहिल्यापासून सांगत होतों, कीं अेक वेळ गायकवाडसरकार विलायतेला जायचे थांबतील, पण आमचे दाजीसाहेब म्युनिसिपालिटींत गेल्याशिवाय कधीं राहायचे नाहींत ! आणि तुम्हीं आपलं खुशाल छापून टाकलंत तुमच्या ' दुष्काळ ' पत्रांत, अगदीं जाड्याजाड्या टाअिपांत, कीं दाजीसाहेब यंदा अुभे राहत नाहींत !
**चक्रदेव** : आम्हांला काय ? आमच्याकडे बातमी आली तशी छापली—
**भीमाशंकर** : हेंच तर तुमचं चुकतं ! वाटेल त्या बातम्या चौकशी न करतां तुम्हीं लोक छापतां आणि मग भलभलत्या फिर्यादी न् खटले अंगावर ओढून घेतां ! जरा संभाळून काम करत जा—
**गोवर्धन** : हें पहा भीमाशंकर, चक्रदेवांनीं बातमी छापली ती कांहीं खोटी नाहीं !
**भीमाशंकर** : म्हणजे काय ?
**गोवर्धन** : यंदा खरोखरच निवडणुकीला अुभं राहायचा आमचा विचार नाहीं—आतां पुष्कळ झालं ! बारा वर्षं आम्ही म्युनिसिपालिटींत आहोंत—आमची सगळी हौस पुरली—आतां नवीन नवीन लोकांनीं म्युनिसिपालिटींत जायला पाहिजे— शिवाय आतां आमची प्रकृतीहि बरी नाहीं—आणि मुख्य कारण म्हणजे आम्हीं म्युनिसि-पालिटींत जाअू नये अशी आमच्या मंडळींची अिच्छा आहे. तिची मर्जी आम्हांला कशी मोडतां येअील ?
**चक्रदेव** : द्या टाळी !—अगदीं हेंच आम्हीं आमच्या ' दुष्काळ ' पत्रांत छापलं होतं.

**भीमाशंकर** : छे–छे ! बोलताय् काय ! तुम्ही म्युनिसिपालिटींत गेला नाहींत तर या म्युनिसिपालिटीचं आणि आमच्या या शहराचं होणार कसं ! तशांत यंदा कॉंग्रेस म्युनिसिपालिटींत शिरूं पाहत आहे. तुमच्यासारखे अनुभवी, भारदस्त आणि दणदणीत लोक या वेळीं तिथं गेले नाहींत तर हे खादीवाले टोळभैरव त्या म्युनिसिपालिटीचा अगदीं झेकोस्लोव्हाकिया करून टाकतील !

**गोवर्धन** : तुम्हां मंडळींचा फारच आग्रह असेल तर मला अुभं राहायलाच पाहिजे ! मात्र आमच्या घरांतल्या मंडळींची समजूत तुम्हांला घालावी लागेल अं ! तुमच्यासारखे हितचिंतक आम्हांला पाठिंबा द्यायला तयार असल्यावर—

**चक्रदेव** : पाठिंबा ! अहो सॉलिड सपोर्ट ! आमच्या ' दुष्काळ ' पत्राची जी लागेल ती मदत मी तुम्हांला द्यायला तयार आहें. आमचे जे जे वर्गणीदार तुमचे मतदार असतील, त्यांच्या मतांची तुम्ही काळजीच करूं नका. तुम्ही सांगा मात्र, पाहिजे तर रोज तुमच्यावर अग्रलेख खरडतों !–जागा सांपडेल तिथं तुमचा फोटो छापतों.

**भीमाशंकर** : यांचाच फोटो छापत जा अं मात्र ! नाहीं तर दुसऱ्या कोणाचा छापाल !

**चक्रदेव** : तें काय तुम्हांला करायचंय् ? खालीं नांव घातलं म्हणजे झालं ! परवां हिटलरचा फोटो छापायचा होता, पण ब्लॉकच मिळेना ! तेव्हां दिला चार्ली चाप-लीनचा फोटो दडपून अन् काय ! आणि खालीं छापलं हिटलर ! चालायचंच हें.

**गोवर्धन** : तुमच्या पत्राची अेवढी मदत असल्यावर मात्र भयच नाहीं कसलं—

**चक्रदेव** : वर्तमानपत्रांचं पाठबळ असल्याशिवाय हल्लींच्या काळीं निवडणूक लढवतां येणं अशक्य आहे. फक्त तुम्ही अुभे राहा ! बाकीचं सारं आम्ही पाहून घेतों.

**भीमाशंकर** : साऱ्या सनातनी ब्राह्मण आणि ब्राह्मणेतरांचीं मतं अेकजात तुम्हांला मिळवून देण्याची हमी मी घेतों. तेवढ्यासाठीं तर सोन्यामारुतीपक्षाची स्थापना केली आहे ! म्युनिसिपालिटींत जाअून हिंदु धर्माचं वाटोळं करायचा या लोकांचा विचार आहे. यांचीं कंरबडीं मोडायला तुमच्यासारखे धर्माभिमानी लोक तिथं जायला पाहिजेत ! ( प्रमोदला ) का हो कॉंग्रेसवाले, तुम्हीं कां आतां गप्प ! का महात्मा गांधींप्रमाणं तुम्हींहि मौनव्रत धारण केलं आहे ?

**प्रमोद** : तुमच्याशीं काय बोलायचंय् ? तुम्ही लोकांनीं कितीहि आपल्या शेपट्या

भापटल्या आणि आयाळी पिंजारल्या तरी कॉंग्रेसचंच बहुमत म्युनिसिपालिटींत होणार ही गोष्ट वज्रलेप आहे.

**चक्रदेव** : हें पहा, म्युनिसिपालिटींत तुमच्या कॉंग्रेसपक्षाचं बहुमत होवो अगर यांच्या सोन्यामारुतीपक्षाचं बहुमत होवो—आम्हांला त्याच्याशीं कर्तव्य नाहीं. कारण आमचं 'दुष्काळ' पत्र कोणत्याच पक्षाचं नाहीं. कोणी का म्युनिसिपालिटींत जाअीना ! पण या म्युनिसिपालिटीच्या कारभारांत कांहीं तरी क्रांति घडून आलीच पाहिजे हेंच आमचं म्हणणं.

**भीमाशंकर** टाळी द्या ! आमचं तरी दुसरं काय म्हणणं आहे ? आम्हांला या गांवांत राहायची शरम वाटायला लागली आहे. काय म्युनिसिपालिटी आहे का चेष्टा आहे ! परवां तर म्हणे सभेंत दोघा सभासदांनीं एकमेकांशीं जोड्यांनीं मारामारी केली !

**गोवर्धन** : म्हणजे—मींच ती मारामारी थांबवली कीं ! मधल्यामध्यें मलाहि थोडासा प्रसाद बसला ! अजून पाठ दुखते आहे. हें तर कांहींच नाहीं. गेल्या वर्षी एका सभासदानं अध्यक्षांना आअीवरून शिवी दिली तेव्हां अध्यक्ष अर्धा तास बेशुद्ध पडून होते आपल्या खुर्चीत ! आतां तुम्ही म्हणाल, कीं तुम्ही अितकीं वर्षे म्युनिसिपालिटींत आहां—तुम्ही कां या गोष्टीला आळा घालीत नाहीं ? पण शक्य नाहीं—अडाणी आणि आडमुठ्या लोकांशीं गांठ ! हे लोक तिथं आहेत तोंपर्यंत म्युनिसिपालिटीची सुधारणा होणं शक्य नाहीं.

**भीमाशंकर** : आणि तुमच्या या सभा—तहकुबीनं तर अगदीं बेजार केलं आहे. कोण केव्हां मरतो आहे आणि सभा तहकूब करायला केव्हां सांपडते आहे यासाठी सारे जसे कांहीं अगदीं कावळ्यासारखे टपून बसले आहेत ! बादशहांचे काका वारले तरी सभा तहकूब, अध्यक्षांची सासू वारली तरी सभा तहकूब आणि एखाद्या सभासदाच्या घरची म्हैस मेली तरी सभा तहकूब !

**गोवर्धन** : कुणाला कांहीं कामच करायला नको. ज्याला त्याला चान्स पाहिजे अन् अध्यक्ष व्हायला पाहिजे. अकलेच्या नांवानं मात्र शून्य ! अजेंडा आणि बजेट यांतला फरक सांगतां यायचा नाहीं विचारला तर—

**चक्रदेव** : म्हणूनच म्युनिसिपल कारभारांत अेवढी अंदाधुंदी माजलेली आहे. लांचलुचपत आणि पैसे खाणं याला तर सुमार राहिला नाहीं. परवां तर म्हणे अेका चांगल्या सभ्य सभासदानं दहा हजार रुपयांचा कचराच लांबवला आणि दुसऱ्या

एका संभावित म्हणून समजल्या जाणाऱ्या सभासदानं शिवाजी रोडवरील पांच रुपये स्क्वेअर फुटाची जागा चार आणे स्क्वेअर फुटानं घशांत टाकली!

**गोवर्धन :** तें कांहीं विचारूं नका! फार बदमाष आहेत अेकेक!

**भीमाशंकर :** नागरिकांना गांवांत राहणं अगदीं अशक्य झालं आहे! अेक सोय धड असेल तर शपथ! साऱ्या बोळांत अिथून तिथून अंधार? गेल्या आठवड्यांत रात्रीं मी अेका बोळांत गेलों होतों—

**प्रमोद :** बोळांत! काय म्हणतां! रात्रीचे कशाला गेला होता बोळांत?

**भीमाशंकर :** कशाला म्हणजे?—अेका नायकिणीकडे जायचं होतं मला—

**प्रमोद :** (कानांवर हात ठेवून) नायकिणीकडे! तोबा-तोबा! कांहीं सांगूं नका पुढचं!

**भीमाशंकर :** भलताच समज करून घेअूं नका. अेका नायकिणीकडे सत्य-नारायण सांगण्याचं आमंत्रण होतं मला; तर त्या बोळांत असा अंधार म्हणतां! अेक दिवा नाहीं!

**प्रमोद :** नायकिणींच्या बोळांत अुजेड ठेवण्याअितकी म्युनिसिपालिटी मूर्ख नाहीं!

**भीमाशंकर :** बरं, अेवढ्यानं का भागतंय-म्युनिसिपालिटीनं अेक ड्रेनेज रस्त्याच्या मधोमध अुकरून ठेवलं होतं. अंधारांत मला दिसलं नाहीं, पाय घस-रला आणि जो आंत कोलमडलों तों गळ्यापर्यंत सबंध अंग लडमडून निघालं! मरतां मरतां वांचलों सोन्यामारुतीच्या कृपेनं—

**प्रमोद :** सत्यनारायणाचा प्रसाद चांगलाच मिळाला म्हणायचा.

**भीमाशंकर :** कोणत्या गाढवानं ही ड्रेनेजची योजना या गांवांत आणली कोणास ठाअूक!

**गोवर्धन :** अहो, माझी योजना आहे ती.

**भीमाशंकर :** असं का? नाहीं-तशी ती योजना कांहीं वाअीट नाहीं; पण थोडीशी देखरेख जास्त ठेवायला पाहिजे या कामावर!

**चक्रदेव :** तुम्ही म्हणतां तें बरोबर आहे. म्हणजे परवां असं झालं-आमच्या घरापुढं रस्त्यांतून अेकदम अेक पाझर फुटला-चांगली करंगळीअेवढी पांढऱ्या पाण्याची धार लागली-लोकांना वाटलं गंगा आली! मग काय-ही गर्दी! सारं गांव लोटलं! जो येतोय् तो आपला डोळे मिटून तीर्थ घेतो आहे! काशीला जाण्याचा खर्च वांचला म्हणून गांवांतल्या साऱ्या म्हाताऱ्या आणि म्हातारे बेहद्द

खूष ! आठ दिवसांनीं म्युनिसिपालिटीचे लोक टिकाव न् फावडीं घेऊन कामाला आले तेव्हां कळलं कीं ड्रेनेजचा पाअीप फुटला होता तिथं.

[ पितांबर वकील घाअीघाअीनें प्रवेश करतो.

**पितांबर** : दाजीसाहेब कुठं आहेत—दाजीसाहेब कुठं आहेत ?

**गोवर्धन** : काय हो, काय बातमी ? काम फत्ते ?

**पितांबर** : अिकडे या आधीं ! ( गोवर्धनच्या कानांत कांहीं घाअीघाअीनें सांगतो. ) अेवढ्यावर अडून बसलं आहे ! आतां तुम्हींच प्रत्यक्ष जायला पाहिजे; त्याशिवाय हें होणार नाहीं. जलदी करा. माझी गाडी बाहेर अुभी आहे ! अेका क्षणाचा विलंब कराल तर काम फसलं म्हणून समजा—

**गोवर्धन** : खरंच !

[ घाअीघाअीनें आंत जातो. पितांबर 'हुश्श-हुश्श' करीत कोचावर बसतो.

**भीमाशंकर** : काय भानगड आहे ही ?

**चक्रदेव** : कांहीं तरी लफडं दिसतंय् हें !

[ पितांबर कांहीं न बोलतां त्यांना डोळ्यांनीं गप्प बसा म्हणून खुणावतो. अितक्यांत गोवर्धन कोट घालीत बाहेर येतात.

**गोवर्धन** : चला.

**पितांबर** : नाहीं तुम्हीच अेकटे जा ! आणि माझं नांव मात्र सांगूं नका.

[ गोवर्धन जातात.

**पितांबर** : ( प्रमोदला ) तुम्ही कॉँग्रेसवाले म्हणजे महाभयंकर लोक आहांत ! तुम्हां लोकांना कांहीं धोरणच नाहीं ! मी म्हणतों या दाजीसाहेबांना कॉँग्रेसचं तिकीट द्यायला काय हरकत आहे ?

**भीमाशंकर** : दाजीसाहेबांना—अन् कॉंग्रेसचं तिकीट ? काय बोलताय् काय ?

**चक्रदेव** : अन् दाजीसाहेबांना कॉँग्रेस-तिकिटाची जरूरी काय ?

**पितांबर** : म्हणजे, तुम्हांला माहीत नाहीं ? दाजीसाहेब कॉँग्रेसचे मेंबर झाले आहेत ?

**भीमाशंकर** : केव्हां ?

**चक्रदेव** : कधीं ?

**पितांबर** : आणि येत्या निवडणुकींत कॉँग्रेसचं तिकीट मिळण्यासाठीं अर्ज केला आहे त्यांनीं !

**चक्रदेव :** सेन्सेशनल् बातमी ! मला आतांच्या आतां 'दुष्काळ' पत्राची जादा पुरवणी काढली पाहिजे.

**भीमशंकर :** माझा तर विश्वासच बसत नाहीं ! काँग्रेसला शिव्या देतां देतां यांचा न् आमचा जन्म गेला, आणि हें काय आतां भलतंच !

**पितांबर :** मींच त्यांना आग्रह केला ! म्हटलं ही काँग्रेसची पर्वणी आली आहे आतां; अुगीच निवडणुकीपायीं पांच अन् दहा हजार खर्च करण्यापेक्षां काँग्रेसचं तिकीट मिळवा अन् फुकटांत अिलेक्शन पदरांत पाडून घ्या ! पण हे काँग्रेसचे लोक असे अिरसाल आहेत, कीं यांना तिकीट द्यायला तयार नाहीत ! अितका वेळ त्या निवडणूक मंडळाशीं मी हुज्जत घालीत बसलों होतों.

**भीमाशंकर :** मग हे गेले कुठं !

**पितांबर :** काँग्रेस–हाअुसमधे ! समक्ष गेलं तरच होण्यासारखं आहे ! अजून थोडा चान्स आहे—

**भीमाशंकर :** मला त्यांच्या पाठोपाठ जाअून त्यांचं मन वळवलंच पाहिजे. असला मोहरा काँग्रेसला मिळाला म्हणजे आमच्या सोन्यामारुतीपक्षाचा निकालच लागला !

[ घाअीघाअीनें जातो.

**प्रमोद :** मला आतां अिथून पळच काढला पाहिजे.

**चक्रदेव :** आतां पळ काढाल तर काय झालं ! बाकी खरं सांगायचं म्हणजे दाजीसाहेबांनीं आतां निवडणुकीला अुभं राहूं नये.

**पितांबर** . तें कां ?

**चक्रदेव** ( प्रमोदला ) बोलूं का हो ? आपण कुणाच्या पाठीमागं निंदा करीत नाहीं, पण खरं सांगायला हरकत नाहीं. गांवांत त्यांच्या नांवानं अशी बोंब आहे म्हणतां–कांहीं विचारूं नका ! या म्युनिसिपालिटीची खरी जर कुणी बदनामी केली असेल तर ती त्यांनीं ! ते अुभे राहिले तर त्यांना कुणाचाहि पाठिंबा मिळणं शक्य नाहीं !

**प्रमोद :** काय हो पितांबर, तुम्ही यंदा अुभे राहात नाहीं ?

**पितांबर :** हें पहा, आमची म्युनिसिपालिटीची हौस आतां पुरली. म्युनिसिपालिटींत जाअून आम्हांला जें काय साधायचं होतं तें साधलं ! आतां फिरून कशाला जा ?

**चक्रदेव** : काय साधलं बुवा?

**पितांबर** : सांगतों. पण तुमच्या वर्तमानपत्रांत छापूं नका अं! आमच्या घरापुढचा आणि मागचा दोन्ही रस्ते डांबराचे झाले! आणि बाजूचे दोन्ही बोळहि कांक्रीटचे करून घेतले. घरासमोर एक मारुतीची मूर्ति होती पुष्कळ वर्षे पडलेली. तिच्या आधारावर घराला सार्वजनिक देवस्थान ठरवून नळपट्टी आणि घरपट्टी कायमची माफ करवून घेतली. मंडअींत माझ्या मालकीचे पांच गाळेहि आहेत—अर्थात् माझ्या मेव्हण्याच्या नांवावर! प्रत्येक गाळा पन्नास पन्नास रुपयाला पोटभाड्यानं देअून टाकला आहे! त्याचं जवळ जवळ दोनशें रुपये महिना अविच्छिन्न अुत्पन्न करून ठेवलं आहे. आतां वकिली नाहीं केली तरी चालेल.

**चक्रदेव** : वर्तमानपत्र चालवण्यापेक्षां मला आतां म्युनिसिपालिटींत जावंसं वाटूं लागलं आहे.

**पितांबर** : सगळ्यांना ते साधत नाहीं संपादक! तसंच, आमच्या आळींत बाजीराव पेशव्यांच्या वेळेचा अेक हौद होता पाण्याचा—मस्तानी हौद म्हणून; तुम्हांला ठाअूक असेल! त्याचं नांव बदलून त्याला आमच्या आअीचं नांव दिलं आणि घरासमोरून जाणाऱ्या रस्त्याला स्वतःचं नांव देअून या गांवच्या भूगोलांत स्वतःचं नांव अजरामर करून टाकलं!

**चक्रदेव** : म्हणजे, अैतिहासिक नांव देखील तुम्हीं बदलूं शकतां?

**प्रमोद** : पूर्वीच्या काळीं नांवं अजरामर करायला रक्त सांडावं लागत असे—आतां म्युनिसिपालिटीच्या ठरावानं वाटेल त्या बुट्टुक माणसाचं नांव अजरामर होअूं शकतं! सिंहगड किल्ला म्युनिसिपालिटीच्या हद्दींत नाहीं हें नशिबच म्हणायचं! नाहीं तर त्यालाहि तुम्हीं आपल्या वडलांचं नांव देअून टाकलं असतं! हें सारं थांबवण्यासाठींच कॉंग्रेस म्युनिसिपालिटींत जात आहे, समजलांत!

[ प्रमिला घाअीघाअीनें प्रवेश करते.

**प्रमिला** : कुठं आहेत प्रमोद! किती शोधायचं तुम्हांला! अिथं बसलांत होय!

**प्रमोद** : म्हणजे आज भाअूबीज नाहीं का?

**प्रमिला** आनंदाची बातमी सांगायची आहे मला—आमच्या महिलामंडळानं यंदा स्त्रियांच्या जागेसाठीं मलाच अुभं करायचं ठरवलं आहे. अगदीं अेकमतानं निवड झाली माझी—

**चक्रदेव** : काय म्हणतां! तुमच्या फोटोचा ब्लॉक द्या आधीं—ही बातमी आमच्या 'दुष्काळ' पत्रांत हेडलाअीन देअून छापली पाहिजे अुद्यां!

**प्रमिला :** काय हो–बोलत नाहीं ! तुम्हांला नाहीं आनंद झाला ?

**प्रमोद :** मला न विचारतां हा अुद्योग करायला तुला सांगितलं कुणी ? आतांच्या आतां त्या महिलामंडळांत जा आणि आपलं नांव मागं घे—

**पितांबर :** लग्न व्हायच्या आधींच तुम्ही यांच्यावर सत्ता गाजवायला लागला काय हो ?

**चक्रदेव :** म्हणजे यांचं लग्न ठरलं आहे काय ? सेन्सेशनल न्यूज ! एवढ्या बातमीवर दोन कॉलम भरून टाकीन मीं ! प्रमोद तुमचा ब्लॉक द्या आधीं—

**प्रमोद :** सारे लोक आपापले ब्लॉक घेऊन गांवांत हिंडतात असं वाटतं काय तुम्हांला ? काय डोकं आहे का ब्लॉक आहे—

**प्रमिला :** मीं नांव मागं घेणार नाहीं ! महिलामंडळाचे लोक मला काय म्हणतील ? मी अुभी राहणार ! या बाबतींत मी तुमचं कांहीं अेक अैकणार नाहीं !

**पितांबर :** शिस्तभंग—शिस्तभंग होतो आहे, प्रमिलाबाई हा !

**प्रमोद :** तुला हें कळायला पाहिजे, कीं कॉंग्रेस या निवडणुकींत मला अुभं करण्याचा संभव आहे. दोघांनीं म्युनिसिपालिटींत जाअून काय करायचं ?

**पितांबर :** काय म्हणजे–रोमान्स ! आमच्या म्युनिसिपालिटींत दिवसा अंधार असतो–तिथं रोमान्स करायला पुष्कळ जागा आहे. तुम्ही दोघं म्युनिसिपालिटींत गेल्याशिवाय तिथल्या गद्य कारभारांत काव्य निर्माण व्हायचं नाहीं !

**चक्रदेव :** खरोखरच, लग्न झालेलीं जोडपीं म्युनिसिपालिटींत गेलीं तर कारभार किती सुरळीत चालेल ! सारे ठराव अेकमतानं पास !

**प्रमोद :** चूक आहे ! भयंकर भांडाभांडी होअील ! आणि घटस्फोटाशिवाय कांहीं अेक काम व्हायचं नाहीं !

**पितांबर :** त्यापेक्षां तुम्ही असं करा–म्युनिसिपालिटींत गेल्यावरच लग्न करा–म्हणजे लग्नसमारंभ म्युनिसिपालिटीच्या खर्चानं होअील–आणि वरात तर अशी काय ग्रँड निघेल म्हणतां तुमची ! मला तर तें दृश्य डोळ्यापुढं दिसत आहे ! सारे म्युनिसिपालिटीचे पट्टेवाले मारे पुढं चालले आहेत, त्यांच्या मागोमाग सारे झाडूवाले–मुकादम–भंगी–आणि अुंदीर पकडणारे पिंजरेवाले चालले आहेत. शृंगारलेल्या अँब्युलन्सकारमधें तुम्ही दोघें बसला आहांत–तुमच्या मागं चीफ ऑफिसर, अिंजिनीअर, हेल्थ ऑफिसर आणि म्युनिसिपालिटीचे झाडून सारे कारकून अदबीनं चालले आहेत. त्यांच्या मागोमाग

सारे म्युनिसिपालिटीचे मेंबर–आणि सर्वांच्या शेवटीं अेका रांगेनं हळूहळू चाल-लेल्या अेकजात कचऱ्याच्या मोटारी !/

**चक्रदेव :** पण ही वरात जायची कुठं ?

**पितांबर :** कुठं म्हणजे म्युनिसिपालिटींत–त्या दिवशींची सभा तहकूब ! म्युनि सिपल हॉलमध्येंच हनिमून !

**प्रमिला :** काय वाटेल तें म्हणालां तरी मी आतां नांव मागं घेणार नाहीं. तुमच्यासारख्या बुद्धिवान् माणसांनीं म्युनिसिपालिटींत जाअून काय करायचंय् ! जवाहरलाल नेहरूंनींच लिहिलं आहे कुठंसं, किं बुद्धिवान् माणसांनीं म्युनिसि-पालिटीच्या कचऱ्यांत आपलं डोकं कधीं घालूं नये. तुम्हीं पुढच्या वेळीं कौन्सिल-लाच अुभे रहा म्हणजे झालं !

**प्रमोद :** आधीं म्युनिसिपालिटी आणि मग कौन्सिल–अशाच क्रमाक्रमानं जायचं असतं ! मला यंदा म्युनिसिपालिटींत गेलंच पाहिजे—

**प्रमिला :** नाहीं, मी जाणार—

**प्रमोद :** तूं माझ्यासाठीं बसलं पाहिजेस !

**प्रमिला :** तुम्हीं माझ्यासाठीं बसलं पाहिजे !

**प्रमोद :** मला बसतां यायचं नाहीं ! कॉंग्रेसची आज्ञा मला मोडतां यायची नाहीं.

[ आंतून अतिशय प्रक्षुब्ध झालेला गोवर्धन नि भीमाशंकर येतात. गोवर्धन आंतूनच–‘ कॉंग्रेसच्या आज्ञेला विचारतंय् कोण ! ’

**गोवर्धन :** म्हणे कॉंग्रेसची आज्ञा ! हरामखोर आहेत सारे कॉंग्रेसवाले ! मला तिकीट नाहीं ! आणि–( प्रमोदला बघून ) तूं अजून अिथंच–बदमाष, पाजी–तुझंच कारस्थान आहे हें सारं ! मला कॉंग्रेसचं तिकीट मिळवून देतों अशा थापा मारून माझा गळा कापलास–आणि माझ्याअैवजीं तूं या वॉर्डमधें स्वतःला तिकीट मिळवलंस ?

**पितांबर :** मी पहिल्यापासून सांगत होतों–या कॉंग्रेसच्या नादीं तुम्ही लागूं नका !

**चक्रदेव :** काय, तुम्हांला तिकीट मिळालं नाहीं ? तुम्ही अर्ज करून ! शेम ! हलकट आहेत लेकाचे !

**भीमाशंकर :** ( हातांतलें अेक पत्रक दाखवीत ) ही–ही यादी पहा ! कुठले

कोण पहिलवान, हॉटेलवाले, म्हशी धुणारे, गवळी, धनगर अन् जिनगर अुभे केले आहेत ! हे म्हणे कॉंग्रेसचे अधिकृत अुमेदवार !

**गोवर्धन :** वाटेल त्या अुडाणटप्पूला तिकीट मिळतं अन् मला मिळत नाहीं. डोंगराअेवढी माझी कामगिरी—बारा वर्षांची माझी तपश्चर्या—मला तिकीट नाहीं ! हा अपमान मी कसा सहन करूं ?

**भीमाशंकर :** हा तुमचा अपमान नाहीं—हा आमचा अपमान आहे !

**चक्रदेव :** ही मुद्दाम केलेली आमची नाचक्की आहे !

**पितांबर :** बुद्धिमत्तेचा आणि अनुभवाचा हा अुपमर्द आहे !

**गोवर्धन :** आणि माझ्या नाकावर टिच्चून तूं—माझा मेहुणा या वॉर्डमध्यें अुभा राहणार ! पाहतों तूं कसा निवडून येतोस तें ! अुभा चिरून टाकीन ! मी या वॉर्डाचा सुलतान आहें ! दिवसा खून करीन—तें कांहीं नाहीं—भीमाशंकर—चक्रदेव—पितांबर, आतां कॉंग्रेसवर सूड !

**तिघे :** आमची तयारी आहे ! सूड—दुसरं कांहीं नाहीं !

**गोवर्धन :** या वॉर्डांतून मी अुभा राहणार—आणि कॉंग्रेसचं कंबरडं मोडणार ! भीमाशंकर, सोन्यामारुतीपक्षातर्फे माझं नांव जाहीर करा !

**भीमाशंकर :** सोन्यामारुती की जय !

**गोवर्धन :** चक्रदेव, 'दुष्काळ' पत्राची चार पानांची जादा पुरवणी काढा. साऱ्या पानांवर माझं नांव छापा आणि माझेच ब्लॉक छापा ! पळा—पितांबर, तुम्ही आजपासून कोर्टांत रजा घ्या—आणि प्रत्येक गल्लींतून माझ्या निवडणुकीचीं ऑफिसं उघडा—पिलोबा, बसलांत काय तिकडे ! मी अुभा आहें—आतांचे आतां चाळींत जा आपल्या—आठ दिवसांच्या आंत भाडोत्री सांगतील ती दुरुस्ती करून द्या—प्रत्येक खोलींत नळ द्या—मोरी द्या, आणि पाहिजे तर संडास बांधा ! वाटेल तितके पैसे खर्च झाले तरी हरकत नाहीं—घरादाराचा लिलांव झाला तरी हरकत नाहीं—पण या निवडणुकींत कॉंग्रेसला जमीनदोस्त केल्याशिवाय राहणार नाहीं !

**प्रमोद :** ( चिडून ) कॉंग्रेसला जमीनदोस्त करायला तुमच्या बेचाळीस पिढ्या स्वर्गांतून खालीं अुतरल्या पाहिजेत !

**गोवर्धन :** बाहेर हो—आधीं बाहेर हो—अेक क्षणभर आतां अिथं अुभा राहिलास तर—

[ चिडून त्याच्या अंगावर धांवून जातो. बाकीची मंडळी ' हं–हं–काय हें ! ' असें म्हणत त्यांना आवरतात.

**प्रमिला :** प्रमोद, जा तुम्ही–थांबूं नका आतां—

[ प्रमोद जाअूं लागतो तोंच ओवाळणीचें तबक हातांत घेअून गिरिजा दारांत येते. नंदू तिच्याजवळ आहे.

**गिरिजा :** प्रमोद, कुठं चाललास–ओवाळायचंय् ना ?

**गोवर्धन :** खबरदार त्याला ओवाळशील तर ! घरांत जा—

**गिरिजा :** म्हणजे !–माझ्या अेकुलत्या अेक भावाला तुम्ही मला ओवाळूं देणार नाहीं ?—

**गोवर्धन :** नाहीं—आजपासून तो तुझा भाअू नाहीं आणि माझा मेहुणा नाहीं ! तो माझा शत्रु आहे ! माझ्या घरांत माझ्या शत्रूला मी तुला ओवाळूं देणार नाहीं ? ( प्रमोदला ) बाहेर हो तूं—

**गिरिजा :** ( गहिंवरून ) प्रमोद—

**प्रमोद :** ताअी —

**नंदू :** ( प्रमोदच्या पायांला मिठी मारून ) मामा—

**गोवर्धन :** माझ्यासाठीं आपली अुमेदवारी मागं घेण्याची ओवाळणी जर ह्या तुला घालायला तयार असेल तर मी तुला ओवाळूं देअीन !

**प्रमिला :** ते म्हणतात अेवढं, तर घ्या ना नांव मागं !

**प्रमोद :** ( अेकदम अुसळून ) तूं बोलूं नकोस ! ( गोवर्धनास ) तुमच्यासाठीं अुमेदवारी मागं घेअूं ? मग कान फोडून अैका ! [ कॉंग्रेसच्या आज्ञेपुढं खरा कॉंग्रेस-भक्त असल्या नात्याच्या आणि प्रेमाच्या पाशाचीच काय पण स्वतःच्या प्राणाचीहि कधीं पर्वा करीत नसतो ! ]

[ त्वेषानें चालता होतो. गिरिजा ताट घेअून त्याच्या मागें धांवूं लागते. गोवर्धन ताट अुधळतो. नंदू ' मामा ' म्हणून टाहो फोडतो. प्रमिला प्रमोदच्या मागोमाग जाते.

**गोवर्धन :** मागं फिर–आज तुझा भाअू मेला ! मी अुभा आहे–तुला ठाअूक नाहीं !

**गिरिजा :** मी तुमच्या पायां पडतें–माझ्या गळ्याची शपथ आहे तुम्हांला ! तुम्ही अुभे राहायचं नाहीं–अैका–अैका माझं–बाळाच्या गळ्याची–आपल्या ह्या लाडक्या बाळाच्या गळ्याची शपथ आहे तुम्हांला !

**गोवर्धन :** ( तिला ढकलून ) हो बाजूला—पोटच्या पोराची शपथ घालून पाय मोडतेस माझे ? निवडणुकीला अुभा राहिलेला अुमेदवार पोटचं पोर मधें आलं तर तें कापून टाकायला मागं—पुढं पाहायचा नाहीं ! आतां मी अुभा आहे !

[ ' सायकलकर रद्द करा ' असा जयघोष करीत अेक टोळकें आंत शिरतें. प्रत्येकाच्या हातांत पाट्या आहेत. आघाडीला भाअी टोळ व ताअी पोळ आहेत.

**गोवर्धन :** या—या सायकलकर रद्द करतों—वाटेल ते कर रद्द करतों—मला निवडून द्या—कुठं आहे तें तुमचं पत्रक ? आणा—मी सही करतों त्याच्यावर—वाटेल त्याच्यावर सही करायला माझी तयारी आहे—मी अुभा आहे !

**भाअी टोळ :** ( पत्रक देअून ) तुम्ही आतां निर्धास्त रहा ! आमच्या साऱ्या यूनियनचा तुम्हांला आतां पाठिंबा आहे. सायकलवाले, खटारेवाले, टांगेवाले या साऱ्यांचा तुम्हांला पाठिंबा आहे—आमचा पाठिंबा असल्यावर तुम्हीच काय पण अेखादं गाढव देखील निवडून येअील. करा सही—( गोवर्धन सही करतो. ) खालीं बसा—

**गोवर्धन :** खालीं बसा ! आतां परमेश्वर आला तरी मी बसणार नाहीं. मी आतां अुभा आहे !

[ ' सायकलवाले की जय '—' अिन्किलाब झिंदाबाद ' अित्यादि गर्जना.

पडदा पडतो.

# २

'दुष्काळ' वर्तमानपत्राचें ऑफिस. संपादक चक्रदेव तोंडाने मजकूर सांगत अिकडून तिकडे फेऱ्या घालीत आहे. शेजारीं ढेकणे तो मजकूर टिपून घेत आहेत. चक्रदेव मधूनमधून सिगारेटचे झुरके जोरजोरानें घेत आहे.

**चक्रदेव** : ( मजकूर सांगत आहे ) आम्हांला स्वातंत्र्य पाहिजे आहे–अेक अुद्गार चिन्ह–आम्हांला स्वराज्य पाहिजे आहे–दोन अुद्गार चिन्हें–आम्हांला साम्राज्य पाहिजे आहे–तीन अुद्गार चिन्हें–( सिगारेटचा झुरका मारीत )–छे, हा अग्रलेख म्हटला कीं टाळकं अगदीं अुठून जातं !

[ आंतून एक नोकर–भोपळे त्याचें नांव–येतो.

**भोपळे** : अजून निदान तीन कॉलम तरी मजकूर पाहिजे आहे.

**चक्रदेव** : आकाशवाणी छापलीत—

**भोपळे** : नाहीं—

**चक्रदेव :** तुम्हांला किती वेळां सांगायचं–मजकूर कमी पडला कीं आकाशवाणी छापत जा–मागल्या अंकांतली पुन्हां छापा–' बाअी सुंदराबाई यांच्या लावण्या, लहान कार्ट्यांसाठीं भीमाआत्याच्या गोष्टी, शौकतअल्लीचं सतारवादन, महंमदअल्लीचं तंबोरावादन–गोहरबाबांचं भजन, अकरा ते पांच पंचरंगी क्रिकेटचा सामना–वाटेल तो कार्यक्रम दडपून देत जा–कोणाहि वाचकाजवळ रेडिओ नसतो अन् कोणीहि हा मजकूर वाचीत नसतो–चला पळा !

**भोपळे :** आज प्रेसमन् आले नाहींत. त्यांची बायको वारली—

**चक्रदेव :** बायको वारली ? छान ! मजकूर मिळाला–गृह्यसंस्कार छापा. आमच्या कारखान्यांतील जुने कामगार तुकाराम भिकोबा जाधव यांच्या अत्यंत प्रेमळ पत्नी जिजाबाई यांना संग्रहणीच्या विकारानं आज सकाळीं देवाज्ञा झाली ! खालीं ताजा कलम घाला–फिरून लग्न करायचा विचार आहे. जा–आटपा–( भोपळे जातो. ) हं, कोठपर्यंत आलं ? वाच—

**ढेकणे :** आम्हांला स्वराज्य पाहिजे–दोन अुद्गार चिन्हें–आम्हांला साम्राज्य पाहिजे–तीन अुद्गार चिन्हें–कंसांत विडीचा झुरका ओढून, छे, हा अग्रलेख म्हटला कीं टाळकं अगदीं अुठून जातं !

**चक्रदेव :** आतां फोडूं का टाळकं–हें कुणी लिहायला सांगितलं तुला ? चल चालता हो ! डोकं भडकवून टाकलंस माझं ! आतां अग्रलेख कसा पुरा होणार ! का छापू तुझा गृह्यसंस्कार ! ( शेजारचीं दोन–तीन वर्तमानपत्रें अुचलून चाळतो.) भोपळे, ( भोपळे आंतून येतो. ) 'केसरी'चा आग्रलेख कंपोज करायला द्या–हाच आपला अुद्यांचा अग्रलेख—

**भोपळे :** म्हणजे काय ? केसरीचा अग्रलेख आपल्याला कसा घेतां येअील ?

**चक्रदेव :** जास्ती विचारूं नका–खालीं दोन ओळी फक्त घाला–लिही रे–कालच्या 'केसरी'मध्यें आलेल्या वरील अग्रलेखामधील अक्षर न् अक्षर खोटं आहे असं आमचं मत आहे. बस, खलास; अग्रलेख तयार ! ( ढेकण्यास ) तूं कालचे अंक घेअून विकायला जा बाजारपेठेंत. स्वस्थ बसूं नकोस !

[ ढेकणे जातो. भीमाशंकर येतात.

**चक्रदेव :** या भीमाशंकर–नमस्कार.

**भीमाशंकर :** ( तोंडावर कृत्रिम हास्य ओढून अत्यंत अदबीनें नमस्कार करीत ) नमस्कार–हः हः, नमस्कार !

**चक्रदेव :** अरेच्या ! हा कुठला नमस्कार काढला आहेत आज !

**भीमाशंकर** : याला म्हणतात अिलेक्शनचा नमस्कार! बघा नीट! (पुन्हा तसाच नमस्कार करून) बोला–झालांत कीं नाहीं गार!

**चक्रदेव** : अगदीं–निपश्चित!

**भीमाशंकर** अिलेक्शन सुरू होण्याच्या पूर्वीं दोन महिने रस्त्यावरून येणाऱ्या जाणाऱ्या माणसाला प्रत्येक अुमेदवारानं असा नमस्कार करायला पाहिंजे. सकाळीं घरांतून बाहेर पडायचं तेंच असं डिंकानं हात डकवलल्यासारखं! आणि बत्तिशी अशी फाटल्यासारखी! ओळख असो अगर नसो–मतदार असो अगर नसो–समोर दिसला रे दिसला माणूस, कीं असा नस्मकार! जोड्यापाशीं अुभं करण्याची ज्यांची योग्यता नाहीं त्यांनाहि असाच नमस्कार! नुसतं विचाराचं–'काय ठीक आहे ना?'–आणि जातांना हळूच म्हणायचं–'आमचं तेवढं तें लक्ष्यांत ठेवा!'

**चक्रदेव** : चांगलेच तरबेज दिसतां आहांत तुम्ही!

**भीमाशंकर** : प्रश्न आहे काय! आपण अेक दमडा कधीं खर्च केला नाहीं या निवडणुकींत! दाजीसाहेब वगैरे मंडळी हजारों रुपये खर्च करायची तेव्हां निवडून यायची–पण आपण नुसत्या नमस्कारावर निवडून यायचे! आतां अलीकडे दोन खेपेला आम्ही म्युनिसिपालटींत गेलोंच नाहींत—

**चक्रदेव** : मग यंदा अुभे राहायचा विचार करतां आहांत कीं काय?

**भीमाशंकर** : तें पाहूं–सध्यां नांव तर जाहीर करून ठेवतों. ही घ्या आमची सोन्यामारुती पक्षाच्या अुमेदवारांची यादी, हता पहिला! [यादी पुढें टाकतो.

**चक्रदेव** : पहिलंच नांव आहे कीं तुमचं! पण काय हो–तुम्ही अुभे राहून कसं चालेल? तुम्ही सोन्यामारुती पक्षाचे जीव कीं प्राण! दाजीसाहेबांसाठीं म्हणा, किंवा अितरांसाठीं म्हणा, खटपटी न् भानगडी करण्यासाठीं तुम्ही मोकळे पाहिजेत!

**भीमाशंकर** : महामूर्ख आहांत! हे अिलेक्शनचे डावपेच तुम्हांला कळायचे नाहींत! मी अुभा आहें म्हणजे अिलेक्शनच्या तारखेपर्यंतच अुभा आहे–समजलांत? खटपट बिटपट कांहीं करणार नाहीं आपण, नुसती दमदाटी देत राहणार! आणि अिलेक्शनच्या आधल्या दिवशीं अेखाद्या प्रतिस्पर्ध्याकडून चार–दोन हजार रुपये फुकटाफाकट अुपटून लोकाग्रहास्तव सन्मानानं खालीं बसणार!

**चक्रदेव** : निवडणूक शास्त्रांतले नाना फडणवीस आहांत अगदीं! (यादी वाचून) काय हो, हा खिस्ती अुमेदवार कोण तुम्हीं अुभा केला आहेत? हिंदु

धर्माचं संरक्षण करण्यासाठीं सोन्यामारुती पक्ष म्युनिसिपालिटींत जाणार अशी तुमची घोषणा आहे–तुम्हांला हा असला खिस्ती अुमेदवार कसा उपयोगी पडणार ?

**भीमाशंकर :** खिस्तीच काय–पण शक्य असेल तर अेखादा मुसलमान अुमेदवारहि अुभा करण्याची सोन्यामारुती पक्षाची तयारी आहे. हा काय–हा आंबेडकरांच्या धर्मांतरवादी पक्षाचा अेक महारहि आम्हीं यांत घुसडला आहे! हिंदु धर्माला आणि लोकमान्य टिळकांना शिव्या देण्यांत ज्याचा जन्म गेला असा हा प्रागतिक पक्षांतला अेक शिरगोळाहि आम्हीं आमच्यांत ओढून आणला आहे. हिंदु धर्माचं संरक्षण हें नुसतं बाहेरचं सोंग! कॅांग्रेसला विरोध करणारी जेवढी म्हणून आम्हांला मंडळी मिळतील–मग ती पुराणवाली असोत नाहीं तर कुराणवाली असोत–घाबळीवाडी असोत वा लुंगीवाली असोत–तेवढ्या सगळ्यांना सोन्यामारुतीच्या शेपटानं गुंडाळून अेकत्र आणायचं ही आमची खरी भूमिका आहे!

**चक्रदेव :** तें ठीक आहे–पण तुमचे हे लोक जरा चांगले तरी निवडायचे! ही यादी हातांत घेअून कॅांग्रेसच्या अुमेदवारांना नांवं ठेवावयाला आम्हांला काय तोंड आहे?

**भीमाशंकर :** आतां खरं सांगूं–हे गेले आठ दिवस वणवण फिरतों आहें मी—आमच्या पक्षातर्फे अुभं राहायला माणसंच तयार होत नाहींत चांगलीं. करायचं काय! शेवटीं जे कोणी मिळाले त्यांचीं नांवं दिलींत झालं दडपून या यादींत! भगवंतानंहि सांगून ठेवलं आहे गीतेंत, कीं 'काय वाटेल तें कर पण लोकसंग्रह कर!' तसा हा नुसता लोकसंग्रह आहे. ही यादी अुद्यांच्या अंकांत छापा! मी जातों. मला अजून तो जाहीरनामा तयार करायचा आहे.

**चक्रदेव :** कसला जाहीरनामा?

**भीमाशंकर :** अहो, आमच्या सोन्यामारुती पक्षाचा जाहीरनामा हो! कॅांग्रेसनं जाहीरनामा काढला आहे असं कळतं! त्यांच्या नाकावर टिच्चून आम्हांलाहि आमचा जाहीरनामा काढायला पाहिजे. ते जें काय करतील तें आम्ही करणार! गुद्द्यास गुद्दा आणि ठोशास ठोसा, हें तर मुळीं आमच्या सोन्यामारुती पक्षाचं धोरण आहे!–( पिलोबा येतो ) काय पिलोबा, दाजीसाहेब घरीं आहेत का!

**पिलोबा :** आतांच आले आहेत आणि–त्यांनीं हा चेक दिला आहे यांना—

**भीमाशंकर :** चेक? कसला चेक—

**चक्रदेव :** चेक कुठला हो? पत्र असेल, दरिद्री आहे हा लेकाचा! याला सगळेच कागद चेकसारखे दिसतात.

**भीमाशंकर** : दाजीसाहेबांना मला भेटलंच पाहिजे–त्यांच्या सल्ल्यानं शंकराचार्यांना अिथं आणण्याची तजवीज केली पाहिजे आधीं !

**चक्रदेव** : शंकराचार्यांना कशाला ?

**भीमाशंकर** : शंकराचार्यांच्या अध्यक्षतेखालीं अेक टोलेजंग समारंभ करून त्यांचा आशीर्वाद घेऊन ठेवतों आमच्या पक्षाला ! हिंदु धर्मसंरक्षणाचं जें भूत आम्हीं अुभं करून ठेवलं आहे त्याच्यासाठीं हीं सारीं सोंगं करायलाच पाहिजेत ! [ जातो.

**चक्रदेव** : ( तो गेल्यावर ) फोडूं का टाळकं ! म्हणे चेक आणला आहे ! कुणासमोर काय बोलावं हें कळतं कीं नाहीं ? [ पत्र वाचतो.

**पिलोबा** : हस्तपत्रकांच्या आणखी पांच हजार कॉप्या काढायला सांगितल्यात दाजीसाहेबांनीं. आणि अुद्यांच्या अंकांत फ्रंट सीटवर फोटो पाहिजे म्हणाले—

**चक्रदेव** : फ्रंट सीटवर ! हं–हं–फ्रंट पेजवर ? छापतों–अं–अगदीं फ्रंट सीटवर फोटो छापतों ! ( पाकिटांतील चेक बघून ) काय अडीचशेंच रुपये ! आतांपर्यंत छपाअीचंच काम झालंय हजार रुपयांचं ! दाजीसाहेबांना म्हणावं संध्याकाळच्या आंत आणखी पांचशें रुपयांचा चेक पाहिजे; तर उद्यां फ्रंट सीटवर फोटो येअील ! हें कांहीं मागलं अिलेक्शन नाहीं म्हणावं !–कॉंग्रेसशीं टक्कर द्यायची आहे–पाण्यासारखा पैसा खर्च करायला पाहिजे—जा—पळा.

**पिलोबा** : ( जातां जातां ) आमच्या कमिशनचं तुम्हीं अजून ठरवलं नाहींत !–

**चक्रदेव** : सारं लक्षांत आहे माझ्या ! मोठ्या घरचीं कुत्रीं तुम्ही–तुमच्या तोंडांत हाडूक कोंबल्याशिवाय आमचं काम साधणार कसं ! ( पिलोबा जातो. ) आजकाल ज्याला त्याला कमिशन खायला पाहिजे ! श्राद्धाचे भटजी देखील कमिशन घेतल्याशिवाय पिंड वळायला बसायचे नाहींत.

[ पितांबर वकील प्रवेश करतो.

**पितांबर** : काय हो, काय भानगड आहे ?

**चक्रदेव** : दाजीसाहेबांचा पिल्या हो ! आतां आला होता ! लेकाचा मधल्यामधें कमिशन मागतो आहे !

**पितांबर** : चालायचंच हें ! अिलेक्शन म्हटलं, कीं पैसेखाअू लोकांना असा अूत येतो कीं विचारूं नका ! मी माझ्या अिलेक्शनच्या वेळीं अेक काम दुसऱ्यावर सोंपवीत नसे ! जें काय करायचं तें सगळं स्वतः ! म्हणून पांचशें रुपयांत आपलं अिलेक्शन अुरकत असे, समजलांत !

**चक्रदेव** : तरी पांचशें रुपये ! म्हणजे कमी नाहीं कांहीं !

**पितांबर** : पण म्युनिसिपालिटीच्या अध्यक्षाच्या निवडणुकीच्या वेळीं हें पांचशें रुपये व्याजासह वसूल होत असत तें काय तुम्हांला ठाऊक आहे ! म्हणून आम्हांला निवडणूक नेहमींच फुकटांत पडत असे.

**चक्रदेव** : म्हणजे ! अध्यक्षाच्या निवडणुकीलाहि पैसे लागतात कीं काय ?

**पितांबर** : तुम्हांला ठाऊक नाहीं ! अध्यक्षाची निवडणूक म्हणजे बाकीच्या सभासदांना आपापला निवडणुकीचा खर्च वसूल करण्याची सोनेरी संधि ! पंचवीस हजारांखालीं अध्यक्षाची निवडणूक होत नाहीं मेहेरबान !

**चक्रदेव** : दाजीसाहेबांना या निवडणुकींत किती खर्च येअील असं वाटतं तुम्हांला ?

**पितांबर** : तें तुमच्या आमच्या अिच्छेवर अवलंबून आहे. तुम्हीं या भानगडींत किती डल्ला मारायचं ठरवलं आहे ?

**चक्रदेव** : हें पहा, डल्ला मारण्याबिरण्याचं काम तें तुम्हीं वकील लोकांनीं करावं ! आमचं काम अगदीं अुघडाअुघड आहे ! गेले आठ दिवस कसे ठणठणीत अग्रलेख लिहितों आहें पाहिलंत ना ! पहिला अग्रलेख—'काँग्रेसचे अुमेदवार शेंदूर फांसलेले दगड आहेत !' दुसरा अग्रलेख—'म्युनिसिपालिटींत या गाढवांना जाअूं देअूं नका !' अरे, अेका अग्रलेखाला निदान पन्नास रुपये तरी ! अेक-पैसा पत्र चालवायचं ! चेष्टा नाहीं ! दहा हजार रुपये कर्ज झालं होतं—कौन्सिल अिलेक्शनच्या वेळीं निम्मं फिटलं. या निवडणुकीच्या वेळीं आम्हांला कर्जातून तरी बाहेर पडूं द्या !

**पितांबर** : आमची भूक तुमच्याअेवढी नाहीं. कसं झालं तरी दाजीसाहेब आमचे जुने मित्र आहेत. नाहीं म्हणायला आमची मोटार बरीच जुनी झाली आहे—फोर्डचं नवीन मॉडेल फार चांगलं निघालं आहे म्हणतात. तेवढं जरी या निवडणुकींतून बाहेर पडलं तरी पुष्कळ झालं !

[ भाअी टोळ ताअी पोळला ओढीत आंत आणतो.

**भाअी टोळ** : भिअूं नकोस—संपादक असला म्हणून काय झालं ! तूं आंत ये—त्याचं थोबाड रंगवतो ! ( ती आंत येते. पितांबरास ) काय हो, संपादक कोण—तुम्हीच का ?

**पितांबर** : मी नाहीं, हे—

**भाअी टोळ** : हे ! हो—चेहऱ्यावरून दिसतोय् खरा हा संपादक ! काय हो—कोणत्या गाढवानं तुम्हांला ह्या पत्राचा संपादक केलं ?

**चक्रदेव :** हें पहा जरा बेतानं बोला—

**भाअी टोळ :** तुम्ही बेतानं लिहा आधीं! मग आम्ही बेतानं बोलूं! (पत्र दाखवून) हें–हें तुम्हींच लिहिलं आहे ना?

**चक्रदेव :** हो–मग?—

**भाअी टोळ :** मग! वर विचारताय् आणखी–मग! लाज नाहीं वाटत लिहायला हें! कशानं लिहितां–लेखणीनं का वस्तऱ्यानं? खूप संपादक आहांत! वर्तमानपत्र काढायच्याअैवजीं अेक सलून अुघडा!

**पितांबर :** तुम्ही शांत व्हा! रागावूं नका!

**भाअी टोळ :** मी कॉंग्रेसमन आहें म्हणून–नाहीं तर पायांतला काढला असता!

**चक्रदेव :** अहो, पण झालं काय अेवढं! बोलून चालून काल्पनिक गोष्ट आहे ही—

**भाअी टोळ :** ही काल्पनिक गोष्ट? खुशाल धडधडीत नांवं छापतां आणि म्हणतां काल्पनिक गोष्ट! हें वाचा–'लेनिन–स्टॅलिन–मार्क्स–यांचे बूट पुसण्याची ज्यांची योग्यता नाहीं असे अनेक टोळ भैरव अुडाणटप्पू भाअी आज गांवांतून हिंडत आहेत!' हें कोणाला अुद्देशून लिहिलं आहे! (पितांबरला) तुम्ही सांगा हो—

**पितांबर :** तो गांवांत भाअी टोळ नांवाचा अेक अिसम आहे—

**भाअी टोळ :** अिसम! या देहाला भाअी टोळ म्हणतात!

**पितांबर :** आपणच काय ते?

**चक्रदेव :** बसा ना? अरे, अेक खुर्ची आण रे—

**भाअी टोळ :** हें वाक्य वाचा–'या टोळांच्या तावडींत आजकाल अेक गरीब गाय सांपडली आहे!'–हीच ती गरीब गाय! मुद्दाम घेऊन आलों आहें तुम्हांला दाखवायला. बघा. ही गाय आहे काय? यांचं आडनांव पोळ आहे–ताअी पद्मा पोळ त्या ह्याच!

**चक्रदेव :** काय म्हणतां!

**भाअी टोळ :** मंडअींतल्या भाजीवाल्या यूनियनच्या अध्यक्ष!

**चक्रदेव :** माय् वर्ड!

**भाअी टोळ :** विडीवाल्या यूनिअनच्या अुपाध्यक्ष!

**पितांबर :** बाय् जोव्ह!

**भाअी टोळ :** तुळशीबागेंतल्या वाती वळणाऱ्या यूनिअनच्या संस्थापक!

**चक्रदेव :** वंडरफुल ! अलभ्य लाभ आहे आज! भोपळे, अरे चहा आण, चार टोस्ट– नाहीं तर खारी बिस्किटं आण—

**भाअी टोळ :** एक पिवळा हत्ती पाकीट.

**चक्रदेव :** ( पाकीट पुढें करीत ) हें घ्या.

**भाअी टोळ :** तुम्ही समजतां काय आम्हांला ! मी मनांत आणीन तर तुमच्या छापखान्यांतल्या कामगारांचा संप पुकारीन आणि तुमच्या कारखान्याला टाळं लावायला लावीन !

**चक्रदेव :** चुकलं आमचं !

**भाअी टोळ :** मी कोण आहें ठाअूक आहे–मजुरांचा कैवारी–भांडवलवाल्यांचा वैरी—

**चक्रदेव :** तें पाठ आहे आम्हांला–म्हणणं काय आहे बोला—

**भाअी टोळ :** माफी मागा यांची ! आणि माझीहि !

**पितांबर :** हात् तिच्या ! अेवढंच !

**चक्रदेव :** माफी कांहीं नाहीं–पण दिलगिरी व्यक्त करायला मी केव्हांहि तयार आहे ! संपादक लोक माफी मागत नसून नेहमीं दिलगिरी व्यक्त करीत असतात. हें काय–हे दिलगिरीचे फॉर्म्स मीं कायमचेच छापून ठेवले आहेत–काय तुमचं नांव–ताअी पद्मा पोळ ( एका फॉर्मवर लिहितो नि सही करतो. ) ही घ्या दिलगिरी. ही तुमची दिलगिरी. ( लिहितो. ) झालं आतां समाधान ?

**भाअी टोळ :** अुद्यांच्या अंकांत ही छापून यायला पाहिजे !

**चक्रदेव :** अुत्तम कल्पना ! मजकूर कमी पडत होता तो तरी मिळाला. भोपळे, ( नोकर येतो ) हा मजकूर मोठ्या टाअिपांत अन् चौकटींत छापा ! तुमचा ब्लॉक आहे का ? नसला तर त्या कामिनिअा ऑअिलच्या जाहिरातींतल्या बाअीचा ब्लॉक छापा. म्हणजे लोकांची यांच्याविषयीं निदान कल्पना तरी चांगली होअील ! आणि ( टोळाकडे बोट दाखवून ) यांच्याअैवजीं त्या गजकर्ण मलमाच्या जाहिरातीमधील माणसाचा ब्लॉक छापा !—

**भाअी टोळ :** अरेच्या !—पुन्हां बदनामी !

**चक्रदेव :** माफ करा. हा निवडणुकीचा मोसम आला म्हणजे दुसऱ्याची बदनामी करण्याशिवाय दुसरं आम्हांला कांहीं सुचत नाहीं. गोष्टी म्हणा–कविता म्हणा–व्यंगचित्रं म्हणा–खोट्यानाट्या बातम्या म्हणा–जें मिळेल तें छापायचं

अन् प्रतिपक्ष्याचीं खरींखोटीं बिंगं बाहेर काढून त्यांची नाचक्की करायची हा आमचा अुद्योग असतो.

**ताअी पोळ** : पण तुम्हीं वाटेल तें लिहिलं म्हणून लोकांचा विश्वास कसा बसतो त्याच्यावर ?

**चक्रदेव** : हें निवडणुकीचं मानसशास्त्र आहे. निवडणुकीच्या धामधुमींत अुमेदवारांच्या विरुद्ध वाटेल त्या गोष्टीवर विश्वास ठेवायला मतदारांची तयारी असते. आणि अुमेदवारालाहि प्रत्येक गोष्टीचा वर्तमानपत्रांतून खुलासा करायला वेळ नसतो.

**पितांबर** : काय हो भाअी, आतां तुमची आमची ओळख झाली म्हणून विचारतों, तुम्ही या ताअींना निवडणुकीला अुभ्या कां करीत नाहीं ? नुसत्या नांवावर निवडून येतील. काय नांव आहे ! ताअी पद्मा पोळ !

**भाअी टोळ** : छान ! म्हणजे आमची दोघांची बदनामी करण्याचा यांना सर्रास परवानाच मिळाल्यासारखं होअील !

**चक्रदेव** : वा,–आतां या आम्हांला बहिणीसारख्या आहेत ! आम्ही यांना निवडून आणण्याची हमी घेतों !

**भाअी टोळ** : काय ग, राहायचं का अुभं ? ( ती हंसते. ) राहायचं का ? राहा कीं ! ओ हो !–काय पण सोंग आणलं आहे !

**ताअी पोळ** : आपण म्हटल्यावर मी कां नाहीं अुभी राहणार !

[ अुभी राहून मुरका मारते.

**भाअी टोळ** : मार डाला ! बस खालीं ! बेशक नांव यांचं जाहीर करा ! राहिल्या अुभ्या या ! ( ताई पोळ अेकदम रडूं लागते. ) अरेच्या, रडायला काय झालं !

**ताअी पोळ** : मी निवडणुकीला अुभी राहणार नि स्वराज्याचा अजून पत्ता नाहीं—

**भाअी टोळ** : हं, रडूं नको. मिळेल, लौकरच स्वराज्य मिळेल. जवाहरलाल, सुभाषबाबू, आम्ही,–सध्यां त्याच खटपटीत आहोंत! त्याची गंमत अशी आहे–या निवडणुकींत मीं दुसऱ्याचं काम पत्करलं आहे—

**पितांबर** : तें कुणाचं बुवा ?

**भाअी टोळ** : ( हलकेंच ) दाजीसाहेबांचं !

**चक्रदेव** : अरे हो–त्या दिवशीं सायकल–कराची मिरवणूक तुम्हींच आणली होती

नाहीं का ? टाळी द्या ! हें माझ्या लक्षांत नव्हतं, नाहीं तर तुमच्याबद्दलचा हा मजकूर आला नसता !

**पितांबर :** आम्ही दाजीसाहेबांचंच काम करतों आहोंत ना !

**भाअी टोळ :** खरं—मग तुमचं आमचं गोत्र जुळलं !

**पितांबर :** आम्हांला वाटलं तुम्ही पक्के कॉंग्रेसमन आहांत !

**भाअी टोळ :** त्या गांधीछाप कॉंग्रेसवाल्यांचं आमचं अस्सं आहे. आम्ही सम्पवाले कॉंग्रेसमन आहोंत—

**चक्रदेव :** ताअींच्यासाठीं तुम्हांला आतां निराळं कॅनव्हसिंग करण्याची जरूरी नाहीं ! दाजीसाहेबांच्या कामांत यांचं काम सहज होअून जाअील !

**भाअी टोळ :** कसलंहि अिलेक्शन असूं द्या ! हिला कॅनव्हसिंगची जरूरीच नाहीं मुळीं ! ही पोलवर अुभी राहिली कीं मतदारांचे मुडदे पडतील ! चल ग—मग नांव जाहीर करा हिचं ! आणि ती माफी छापायला विसरूं नका. [ जातात.

**पितांबर :** मतदारांच्या आधीं आमचेच अिथं मुडदे पहायची वेळ आली आहे ! बोला संपादक—काय डाव लढवलाय् !

**चक्रदेव :** माझ्या लक्षांत आलं नाहीं !

**पितांबर :** त्याला वकिलाचं डोकं लागतं ! अेवढ्यासाठीं मीं तुम्हांला प्रमिलाचा फोटो व जाहीरनामा इतक्यांत छापूं नका असं त्या दिवशीं कळवलं होतं. हें सावज अनायासंच आपल्या जाळ्यांत चालत येअील याची मला कल्पना नव्हती ! प्रमिलेला वाटत असेल कीं आपण बिनविरोध निवडून येअूं ! पण ही विरोधाची ठिगणी तिच्या अंगावर पडली म्हणजे तिचा मत्सर आणि स्वाभिमान पेट घेतल्या-शिवाय राहणार नाहीं—आणि त्या भडक्यांत प्रमोदचा बळी दिला म्हणजे दाजी-साहेबांची निवडणूक बिनविरोध फत्ते !

**चक्रदेव :** म्हणजे दाजीसाहेब निवडून यावेत अशी तुमची मनापासून अिच्छा दिसते !

**पितांबर :** म्हणजे काय ! अेखाद्याचे पैसे खायचे म्हणजे त्याचं काम नको का करून द्यायला ! तसला संपादकी कावा आपल्या पोटांत नाहीं—बरं का !

[ प्रमिला येते.

**प्रमिला :** काय हो संपादक, किती वेळां तुमच्याकडे यायचं ? कालपासून तिसरी खेप ही !

**पितांबर** : आम्ही देखील तुमच्याकडे परवां येऊन गेलों !

**चक्रदेव** : हें दाजीसाहेबांचं काम अंगावर घेतल्यापासून अेकसारखं हिंडावं लागतं आहेर ! कॉंग्रेसच्या गोटांतल्या बातम्या काढायच्या म्हणजे ऑफिसांत बसून कसं चालेल ?

**प्रमिला** : तुम्हीं माझा मॅनिफेस्टो छापला नाहींत–फोटोहि छापला नाहींत–त्या दिवशीं ब्लॉक मागून नेलांत—

**पितांबर** : म्हणजे, तुमचं अुभं राहण्याचं नक्की ठरलं !

**प्रमिला** : नक्की ठरलं म्हणजे गांवांतून मिरवणूक काढून जाहीर करायचं असतं कीं काय ! त्या दिवशीं ठरलं तें ठरलं ! स्त्रियांच्या एका जागेसाठीं 'महिलामंडळानं' मला अुभं केलं ही गोष्ट आतां जगजाहीर आहे.

**चक्रदेव** : पण आम्हीं अैकलं तुम्ही बसला म्हणून ! काय हो, पितांबर ?

**पितांबर** : माझीहि कल्पना तीच होती ! प्रमोदचा आणि तुमचा त्या दिवशीं तर केवढा खटका अुडाला ! त्याच्याचमुळं तुम्हीं आपला राजीनामा महिलामंडळाकडे पाठविला अशी गांवांत ज्याच्या त्याच्या तोंडीं बातमी आहे.

**प्रमिला** : साफ खोटं आहे तें ! प्रमोद खूप सांगेल मला बसायला, म्हणून त्याचं थोडंच मी अैकणार आहे ? प्रमोदचा माझा कांहीं संबंध नाहीं.

**पितांबर** : नाहीं का ?—आमची समजूत निराळी होती—!

**चक्रदेव** : अहो, पण तुमचं लग्न ठरलं होतं, त्याचं काय झालं ?—

**प्रमिला** : त्याचं कांहीं एक झालं नाहीं ! तें आहे तसंच आहे ! त्यांचं माझं खाजगी नातं वाटेल तें असलं म्हणून सार्वजनिक कामांत मीं त्यांचं अैकावं असं थोडंच आहे–अुद्यांच्या अंकांत तुम्हीं माझा फोटो अन् मॅनिफेस्टो छापला पाहिजे–

**पितांबर** : हें पहा–आतां त्यांतलं थोडंसं रहस्य मी तुम्हांला सांगतों–तुम्ही प्रमोदला यांतलं अेक अक्षर देखील सांगूं नका ! तुमचा मॅनिफेस्टो अन् फोटो यांनीं छापूं नये म्हणून खुद्द प्रमोदनं येऊन यांना बजावलं माझ्यादेखत—काय हो चक्रदेव ?

**चक्रदेव** : तुम्हीं सांगितलंत म्हणून–नाहीं तर मी या बाबतींत यांच्यापाशीं अेक अक्षर देखील बोललों नसतों–प्रमोदनं माझ्याकडून शपथेवर वचन घेतलं त्या दिवशीं !

**प्रमिला :** प्रमोद इतक्या क्षुद्र मनाचा असेल अशी मला कल्पना नव्हती ! तरीच गेले दोनचार दिवस तो माझं तोंड चुकवतो आहे !

**पितांबर :** खरं सांगायचं म्हणजे या वेळीं प्रमोदनं स्वतः अुभंच राहायचं नाहीं ! काँग्रेसला काय, तो नाहीं तर दुसरे छपन्न अुमेदवार मिळतील ! पण ज्या अर्थी तुम्हांला महिलामंडळानं अुभं केलं आहे त्या अर्थी तुमचा मान राखण्यासाठीं आपल्या स्वार्थावर पाणी सोडून तुमच्याकरितां खटपट करणं हें त्यांचं कर्तव्य आहे

**चक्रदेव :** आमच्या प्रेमाचं कोणी माणूस जर असं निवडणुकीला अुभं राहिलं असतं, तर आपण त्याच्यासाठीं जिवाचं रान केलं असतं.

**प्रमिला :** मला कोणाच्याहि मदतीची जरूरी नाहीं. पुरुषांच्या मदतीवर अवलंबून राहणारी, मी मागल्या पिढींतली नेभळट स्त्री नाहीं ! तुम्हांला माझा मॅनिफेस्टो छापायचा असेल तर छापा, नाहीं तर नका छापूं—मी बिनविरोध निवडून येणार हें तुम्ही नक्की समजून असा !

**पितांबर :** म्हणजे तुमच्या या जागेसाठीं ताअी पोळ अुभ्या आहेत हें तुम्हांला माहीत नाहीं वाटतं ?

**प्रमिला :** कोण ताअी पोळ ?

**पितांबर :** वा ! ताअी पद्मा पोळ—सुप्रसिद्ध कम्युनिस्ट कार्यकर्त्या ! त्यांचं नांव माहीत नाहीं—असा महाराष्ट्रांत अेक मनुष्य नसेल !

**चक्रदेव :** त्यांचा मॅनिफेस्टो अन् फोटो आज आठ दिवस माझ्याकडे येअून पडला आहे—म्हटलं, तुमचं काय ठरतं तें पाहावं अन् मग तें छापावं.

**पितांबर :** त्या अुभ्या राहिल्या नसत्या तर तुम्ही बिनविरोध निवडून आला असतां ,अगदीं नक्की—पण आतां मात्र तुम्हांला अेवढासा देखील चान्स नाहीं—आपलं खरं सांगतों !

**चक्रदेव :** बाकी आमच्याकडून तुम्हांला काय मदत पाहिजे असेल ती केल्यावांचून आम्ही कधींहि राहणार नाहीं !

**प्रमिला :** पाणी मागवा पाहूं थोडं !

[ निराश होअून बसते. चक्रदेव आंतून पाण्याचा कप घेअून येतो.

**पितांबर :** ताअी पोळना अुभं करण्यांत देखील प्रमोदचाच कांहीं तरी डाव असला पाहिजे असा मला जबरदस्त संशय आहे ! काय हो चक्रदेव ?

**चक्रदेव :** माझ्या तोंडून कांहीं काढूं नका—आपल्याला सर्व कांहीं माहिती आहे—पण आपण प्रमोदला वचनानं बांधले गेलों आहोंत !

**प्रमिला :** ताओी पोळची आणि प्रमोदची काय ओळख ?

**पितांबर :** काय ओळख ! अहो, या कॉंग्रेसवाल्यांच्या ओळखी कुठं अन् कशा निघतील तें कांहीं सांगूं नका. आणि प्रमोदच्या कुठं कुठं अन् काय काय ओळखी आहेत याची तुम्हांला त्यांनीं जंत्री थोडीच करून दिली आहे ?

**चक्रदेव :** प्रमोदची अन् ताओी पोळची चांगलीच ओळख आहे. तोच तर तिला या ऑफिसांत घेऊन आला. दोन तास बसले होते. हंसत काय होते, हाता-वर चापट्या काय मारीत होते, पाठीवर थापट्या काय मारीत होते–(जीभ दाबून) अरे हो ! पण मला बोलायचं नाहीं–वचनानं बांधला गेलों आहें मी !—

**प्रमिला :** शक्य नाहीं ! माझ्या प्रमोदच्या हातून निदान हें तरी होणं शक्य नाहीं !

**पितांबर :** तुम्ही आपले मनांत मांडे खात बसा ! पुरुष ही काय अिरसाल चीज आहे हें तुम्हांला ठाअूक कीं आम्हांला ठाअूक ? दोन वेळां घरांत सुग्रास अन्न मिळत असलं, तरी हॉटेलांतली कोरडी मिसळ खायचा मोह आंवरतो का कोणाला ? तसं आहे हें ! प्रेमाचं आणि विवाहाचं चंबूगबाळं तुमच्या ओसरीवर सुरक्षित आहे ही जोंपर्यंत खात्री आहे तोंपर्यंत गांवांत भटक्या मारायला प्रमोद आतां मोकळा आहे !

**चक्रदेव :** पण मी म्हणतों, कीं जर प्रमोदचं तुमच्यावर प्रेम आहे अशी तुमची खात्री आहे, तर मग तुमच्यासाठीं तो बसत कां नाहीं ?

**प्रमिला :** पण कॅांग्रेसची आज्ञा आहे ना—

**पितांबर :** प्रेमापुढें कॉंग्रेसची किंमत ! काय सांगताय् ? प्रेमासाठीं ब्रिटिश साम्राज्यावर लाथ मारणारा तो महात्मा ड्यूक ऑफ विंडसर कोणीकडे आणि कॉंग्रेससाठीं तुमच्या प्रेमावर लाथ मारून म्युनिसिपालिटींत शिरणारा हा बुद्रुक आत्मा कोणीकडे ? कॉंग्रेस ही सत्ता नसून सबब आहे !

**चक्रदेव :** आणि आतां कॉंग्रेसच्या तिकिटावर प्रमोद उभा राहिला म्हणून तो निवडून येअील असं का तुम्हांला वाटतं ? थांबा जरा. भोपळे, (भोपळे येतो) तें माझ्या कपाटांतलं तिसऱ्या खणांतलं तांबड्या कागदांत गुंडाळलेलं पुडकं आहे तें आणा पाहूं. [ भोपळे जातो.

**पितांबर** : जाऊं दे रे ! आतां कशाला ?

**चक्रदेव** : हातच्या कांकणाला आरसा कशाला ! प्रमोद निवडून आला तर संपादकाचा धंदा सोडून म्युनिसिपालिटीच्या नाक्यावर नोकरी पतकरीन ! ( भोपळे पुडकें घेअून येतो. ) हें पाहिलंत !

**प्रमिला** : काय आहे ?

**चक्रदेव** : प्रमोदच्या आयुष्याचा चक्काचूर करणारा—त्याच्या आजपर्यंतच्या नांवलौकिकाला जमीनदोस्त करणारा-हा एक भयंकर बॉंब गोळा आहे ! प्रमोदच्या भानगडीचे किती पुरावे दाखवूं तुम्हाला यांत ! अगदीं खुद्द त्याच्या हस्ताक्षरांतले ! पण आतां नको-वचनानं बांधला गेलों आहें मी ! निवडणुकीच्या आधीं दोन दिवस हा बॉंबगोळा बाहेर काढणार ! हेंच काय, अशा अनेक लोकांच्या भानगडींचे पुरावे जय्यत तयार आहेत मजजवळ !

**पितांबर** : ( खिशांतून अेक पाकीट बाहेर काढतो ) तें राहूं द्या-हें बघा.

**प्रमिला** : हें काय ?

**पितांबर** : फौजदरि कायद्याचा अेक गळफांस आहे याच्यांत ! प्रमोदनं पैशाच्या बाबतींत अेका गृहस्थाशीं केलेल्या विश्वासघाताचे हे कागदपत्र आहेत. निवडणुकीच्या आधीं दोन दिवस फिर्याद दाखल करून तुरुंग-वारंटच काढतों म्हणजे निकाल !

**प्रमिला** : मी स्वप्नांत आहें कीं जागी आहें ! तुम्ही काय सांगतां याच्यावर माझा विश्वासच बसत नाहीं ! हा बॉंबगोळा काय-ही फिर्याद काय-ती ताअी पोळ काय ? अितका भयंकर आहे प्रमोद !

**पितांबर** : हें पहा. प्रमोदच्याबद्दल तुमचं मन कलुषित करून तुमच्या दोघांच्या प्रेमांत विष कालविण्याचा हलकटपणा आमच्या हातून होणार नाहीं. तुमची अिच्छा असेल तर हा सारा पुरावा तुमच्यादेखत अिथल्या अिथं जाळून टाकतों !

**चक्रदेव** : भोपळे, काड्याची पेटी आणा.

[ भोपळे पेटी आणतो. पितांबर, चक्रदेव शांतपणें सिगारेट पेटवितात.

**पितांबर** : ( सिगारेट ओढतांना ) बोला चक्रदेव, काय करायचं आतां ? नाहीं तर हें पहा प्रमिलाताअी, तुम्ही आतां असं करा. अेवींतेवीं प्रमोद कांहीं निवडून येणं शक्य नाहीं. तेंव्हां त्याला बसविण्यांत अन्याय होणार नसून त्याच्यावर अुपकारच होणार आहेत. (निदान झांकली मूठ सव्वा लाखाची) तरी राहील ! तुम्ही त्याच्याकडे आतां जा-हें त्याला कांहीं अेक सांगूं नका—

**चक्रदेव** : सागूं दे कीं–त्याला काय भ्यायचंयू !

**पितांबर** : नको अितक्यांत. तुमच्याजवळ जेवढं कांहीं कौशल्य आहे तेवढं खर्च करा आणि त्याच्याकडून नांव मागं घेण्याचं वचन घ्या ! प्रमोद बसला कीं ताअी पोळचा लेखी राजीनामा आणि हे सारे कागदपत्र तुमच्या हवालींच करतों—

**चक्रदेव** : आणि तुमची निवडणूक बिनविरोध घडवून आणतों.

**प्रमिला** : अशीच्या अशी मी प्रमोदकडे जातें आणि त्याचा कान पकडून त्याला या साऱ्या गोष्टींचा जाब विचारतें ! मी निवडणुकींत पडलें तरी बेहेत्तर, पण माझ्या प्रेमाशीं विश्वासघात करणाऱ्या राक्षसाला मी समाजापुढं खेंचून आणल्या-वांचून राहणार नाहीं.

[ त्वेषानें निघून जाते. पितांबर आणि चक्रदेव अेकमेकांच्या हातांवर आनंदानें टाळ्या मारतात.

**चक्रदेव** : प्रमोदचा निकाल आतां !

**पितांबर** : आणि दाजीसाहेबांची फत्ते ! काय आहे रे या पुडक्यांत–

**चक्रदेव** : 'ब्रह्मचारी'चीं हँडबिलं ! आणि याच्यांत—

**पितांबर** 'समाजस्वास्थ्या'चे अंक !

[ दोघेहि हंसतात.

# [ २ ]

रस्ता. अेक घरमालक आपल्या घरामधून भाअी टोळला हांकलीत रस्त्यापर्यंत' आणीत आहे.

**घरमालक** : होतोस कीं नाहीं बाहेर—

**भाअी टोळ** : अहो–पण—

**मालक** : बाहेर हो आधीं–दिवसाढवळ्या माझ्या घरांत शिरतोस ! ब्रिटिश सर-कारचं राज्य आहे हें–मोगलाई नाहीं ! कांहीं भय–भीति–शरम–लाज–लज्जा कांहीं आहे कीं नाहीं ? बाहेर हो–नाहीं तर मारतों थोतरींत—

[ भाअी टोळचा गळा पकडून हात अुगारतो. भाअी टोळ 'मेलों–मेलों' असें ओरडतो. त्याबरोबर त्याच घरांतले दोन भाडेकरी–अेक ढेकणे नि दुसरे भोपळे हे धांवत येतात.

**ढेकणे :** सबूर–सबूर—

**भोपळे :** मरेल तो–झालं काय ? ( भाअी टोळास ) काय हो ?

**भाअी टोळ :** अजून कांहीं झालं नाहीं ! होत होतं–बरें वेळेवर आलांत, नाहीं तर आणखी दोघांना बोलवावं लागलं असतं !

**ढेकणे :** कशाला ?

**भाअी टोळ :** खांदा द्यायला ! ( खालीं बसतो ) दम लागला !

**भोपळे :** काय मालक, काय भानगड आहे ही ?

**मालक :** म्हणजे त्याचं असं झालं, कीं हा अिसम–

**भाअी टोळ :** ( एकदम अुठून ) अिसम ! मी अिसम नाहीं. पुढें बोला–

**मालक :** मग आहेस कोण, डाकू ! दिसतोय् कसा बेरडासारखा ! पूर्वींचे चोर फार सज्जन म्हणायचे ! रात्रीं सारे लोक झोपल्यानंतर, पाय न वाजवतां मोठ्या आदबशीरपणें घरांत शिरायचे ! पण या हल्लींच्या चोरांना मॅनर्सच नाहींत–खुशाल दिवसाढवळ्या दाणदाणं पाय वाजवीत घरांत शिरतात !

**ढेकणे :** गांवांत चोरांचा हल्लीं सुळसुळाट झाला आहे त्यांतला तर हा नव्हे !

**भोपळे :** बरोबर–ओळखलं याला. हा माणूस दोन-चार दिवस आपल्या आळींतून हिंडतो आहे–आपल्या वाड्यांतहि हा दोन–तीन वेळां येअून गेला–बरोबर अेक बाअीहि असते याच्या ! कुठं आहे रे ती !

**मालक :** चांगला कुटुंबवत्सल चोर दिसतो आहे हा ! ढेकणे, तुम्ही आधीं पोलिसला बोलावून आणा पाहूं–भोपळे, तुम्ही याला आंवळून धरा—

**भाअी टोळ :** काय, वेड लागलंय् काय तुम्हांला ? पोलीस काय आणा–आंवळून काय धरा—

**मालक :** मग सांग–काय काम होतं तुझं आमच्या घरांत ?

**भाअी टोळ :** तुमच्या घरांतच काम होतं माझं–म्हणजे तुमच्या बायकोला भेटायचं होतं—

**मालक** : माझ्या बायकोला ! ( बाह्या सरसावून ) हरामखोर–बेशरम ! ढेकणे–भोपळे, लगावा—

**भाऊी टोळ** : अरे, पण अैकून तर घ्या—म्हणजे काम कांहीं तसलं नव्हतं ! चांगलं म्युनिसिपालिटीचं !

**मालक** : म्युनिसिपालिटीचं काम–अन् आंत–माझ्या घरांत ?

**ढेकणे** : मोरी अुकरायची होती—?

**भोपळे** : का संडास साफ करावयाचा होता ?

**भाऊी टोळ** : म्हणजे मी काय मेहेतर आहे का झाडूवाला आहे ! वा मेहेरबान ! ( यादी पुढें करून ) हें पाहिलंत माझं काम ! बोला–तुमचं नांव बोला–तुमचं हो–

[ यादी चाळूं लागतो.

**ढेकणे नि भोपळे** : म्युनिसिपालिटीच्या अिलेक्शनचं काम होय ?

**मालक** : ( हंसून ) भले, मग आधीं कां नाहीं बोललांत ?

**भाऊी टोळ** : अितका वेळ शंख करतोंय् पण तुम्ही बोलूं द्याल तर ! कुत्र्या· सारखे वसकन् माझ्या अंगावर धांवलांत, अन् माझं नरडंच पकडलंत ! चोर काय–बेरड काय–डाकू काय–झाडू काय ! (अगदीं म्युनिसिपालिटीचं ड्रेनेज फुटावं तसं बोलून घेतलंत—!)

**मालक** : पण तुम्ही तरी अजबच नाहींत का ? मी, थांबा–थांबा म्हणतोंय् तों तुम्ही थेट न्हाणीघरापर्यंत ताड् ताड् टांगा टाकीत गेलांत !

**भाऊी टोळ** : ही मतदारांची यादी नि पेन्सिल हातांत असल्यावर या निवडणुकीच्या मोसमांत आम्हांला कोणाहि मतदाराच्या घरांत वाटेल तिथपर्यंत घुसण्याचा सर्रास परवाना आहे. न्हाणीघरापासून तों शयनमंदिरापर्यंत ! दिवाणखान्यापासून तों अगदीं त्या खान्यापर्यंत ! आम्ही वाटेल तेव्हां, वाटेल त्या वेळीं शिरूं अन् वाटेल त्या चौकशा करूं ! बोला, तुमच्या बापाचं नांव काय ?

**मालक** : पण कां ?

**भाऊी टोळ** : आतां कां नाहीं न् कूं नाहीं ! बापाचं नांव बोला अेकदम !

**मालक** : महादेव—

**भाऊी टोळ** : ( यादी पाहून ) महादेव ! भले मालक, मला फसवतां काय ? तुमचं नांव गजानन–आडनांव देव, घर नंबर चारशें पांच—

**मालक** : बरोबर आहे—

**भाअी टोळ** : मग बापाचं नांव कां बरं खोटं सांगतां ?

**मालक** : म्हणजे, माझ्या बापाचं नांव मला ठाअूक का तुम्हांला ठाअूक !

**भाअी टोळ** : तें परमेश्वरालाच फक्त ठाअूक ! यादींत जें छापलं आहे तें तुमच्या लौकिक बापाचं नांव. वाचा—गजानन महंमद देव.

**मालक** : ( अुसळून ) महंमद !

**ढेकणे** : हिंदु ना हे !

**भोपळे** : चांगले ब्राह्मण !

**भाअी टोळ** : ( कानांवर हात ठेवून ) तें कांहीं मला विचारूं नका—ही यादी बघा !

**मालक** : बंबांत घाला ती यादी ! माझ्या बापाचं नांव महंमद !

**ढेकणे** : म्युनिसिपालिटीचा बाप महंमद—

**भोपळे** : तुमचा बाप महंमद !

**भाअी टोळ** : प्रश्न माझ्या बापाचा नसून यांच्या बापाचा आहे ! पण यांचा बाप महंमद नसून महादेव आहे अशी तुम्हां लोकांची खात्री आहे का !

**मालक** : आतां फाजीलपणा केलांत तर—

**भाअी टोळ** : रागावताय् काय ? त्यांत चिडण्यासारखं काय आहे ! आम्हां भाअी लोकांच्या शास्त्रांतला अेक प्रसिद्ध सिद्धान्त आहे कीं माता ही पुराव्यानं सिद्ध होणारी गोष्ट आहे; पण बाप हा निव्वळ तर्काचा विषय आहे !—जाअूं द्या तें ! कांहीं झालं तरी या निवडणुकींत तुम्हांला हेच तीर्थरूप पत्करून मत द्यावं लागेल. बरं, हें कुणाचं नांव—सौ. मारुती गजानन देव.

**मालक** : सौभाग्यवती मारुती ! अहो, मालती पाहिजे—मारुती नव्हे. काय म्युनिसिपालिटी आहे का चेष्टा आहे ! बाप महंमद, अन् बायको मारुती !

**ढेकणे** : आम्हांला मत आहे का बघा ! नारो अप्पाजी ढेकणे—

**भाअी टोळ** : ( यादी चाळीत ) नारो अप्पाजी—नारो अप्पाजी ढेकणे नाहीं— पण नारो अप्पाजी मांग आहे अेक—

**ढेकणे** : छे, छे ! म्हणजे आमचं नांव छापलंच नाहीं वाटतं याच्यांत !

**भोपळे :** आमच्या घरांत आमचं–आमच्या कुटुंबाचं अन् आमच्या मोरूचं अशीं तीन मतं आहेत.

**ढेकणे :** तुमच्या मोरूला मत ! शेंबडं कार्टे–अन् त्याला हो कुठून मत आलं ?

**भोपळे :** आमचं कुत्रं आहे ना ? त्याची पट्टी भरावी लागते आम्हांला ! ती कुत्रापट्टी आम्हीं मोरूच्या नांवावर भरून हें मत मिळवलं !

**ढेकणे :** हें आम्हांला ठाऊक असतं तर आम्हीं अेक सोडून चार कुत्रीं बाळगलीं असतीं !

**भाअी टोळ :** मग बोला–तुमचीं दोन, अन् यांचीं तीन–पांच मतं आहेत तुमच्या वाड्यांत—

**मालक :** अहो, पांच काय घेअून बसलांत–तीनशें मतं आहेत माझ्या हातांत–अगदीं सॉलीड ! ही सारी गल्ली माझीच आहे म्हणा ना—

**भाअी टोळ :** काय म्हणतां ! टाळी द्या ! मग हीं सारीं मतं आमच्या दाजी-साहेब अिनामदारांनाच मिळालीं पाहिजेत ! [ हँडबिलें देअूं लागतो.

**मालक :** म्हणजे ! दाजीसाहेब अिनामदारांचे कॅनव्हासर का तुम्ही ! मग बाहेर व्हा आधीं—

**भाअी टोळ :** तें कां ?

**मालक :** दाजीसाहेबांना अेक मत देणार नाहीं आम्ही ! डँबिस माणूस !–तीन खेपेला आम्हीं त्याला निवडून दिलं ! पण आतांपर्यंत आमचं अेक काम करून दिलं असेल तर शपथ ! अहो, घरीं गेलं तर तीनतीन तास गांठ पडत नाहीं त्याची ! रस्त्यावरून चालला तर लेकाचा नुसता अस्सा ताठ ! नमस्कार देखील घेत नाहीं !

**भोपळे :** परवां आमची मोरी तुंबली–म्हणून मी त्याच्याकडे गेलों; तर म्हणतो काय–कीं तुमच्या घरांतल्या मोऱ्या साफ करायला मी म्युनिसिपालिटींत गेलों नाहीं !

**मालक :** अन् गेल्या महिन्यांत आमच्या बायकोवर म्युनिसिपालिटीनं खटला भरला–म्हणजे शिवायचं नव्हतं तिला–तेव्हां रस्त्यावर जाअून तिनं ताटवाटी विसळली–नेहमींचंच असतं हें–तर तिला दोन रुपये दंड ! दाजीसाहेबांना म्हटलं खटला काढून घ्या–आम्ही तुम्हांला दर वेळेला निवडून देतों. तर म्हणतो काय

लेकाचा, कीं तुमच्या बापाचं कांहीं अेक लागत नाहीं आम्ही–पांच रुपयांची नोट घेतां तेव्हां अेक व्होट देतां–हें आम्हांला अुत्तर! आम्ही आमचीं मतं गटारांत फेकूं, पण दाजीसाहेबाला यापुढं–शक्य नाहीं!

**भाअी टोळ :** नुसता गैरसमज झाला आहे तुमचा! यापुढं तुमचं वाटेल तें काम करण्याची मी दाजीसाहेबांतर्फे हमी देतों—

**मालक :** पहा बरं, आमची घरपट्टी माफ झाली पाहिजे!

**भाअी टोळ :** कबूल, घरपट्टीपासून पानपट्टीपर्यंत सगळ्या पट्ट्या माफ तुम्हांला!

**मालक :** आमच्या तिसऱ्या मजल्यावर पाणी चढत नाहीं!

**भाअी टोळ :** तुमच्या गच्चीवर कारंजं बांधून देतों कीं!

**मालक :** आमच्या बायकोवर–अन् आमच्या पोरांवर कधीं खटला होतां कामा नये!

**भाअी टोळ :** कबूल–अुद्यांपासून तुमचीं पोरं खुशाल रस्त्यावर बसवीत जा ना! अन् कुटुंबाला सांगा चौकांत जाअून बेशक भांडीं घासा!

**मालक :** अेवढं कबूल असेल, तर विचार करायला हरकत नाहीं–पण हें पहा–यंदा पांचानं भागायचं नाहीं! दुसऱ्या पेठेंतून सात–सात, आठ–आठपर्यंत भाव चढलेला आहे!

**भाअी टोळ :** सात न् आठ काय घेअून बसला आहांत! आमचा भाव दहाचा आहे! (हँडबिलें दाखवून) हा पाहिलांत नागोबा! ही आमची खूण! हा नागोबाच्या डोक्यावरचा दहाचा आंकडा लक्षांत ठेवा!

**मालक :** काय दहा! टाळी द्या! मग आधीं कां नाहीं सांगितलंत! सगळ्या गल्लीचीं मतं तुमचीं! चला–घरांत चला–चहा, कॉफी, कोको–कांहीं तरी घेतलंच पाहिजेत—

**भोपळे :** आमचीं तिन्ही मतं तुम्हांला–अगदीं सॉलीड!

**ढेकणे :** दहा रुपये मिळणार असतील तर नारो अप्पाजी मांगच काय, पण नारो अप्पाजी धेड म्हणूनहि माझी मतं देण्याची तयारी आहे.

**भाअी टोळ :** अेक सांगायचं विसरलों–आपल्या वॉर्डला बायकांची अेक जागा आहे–त्या जागेसाठीं आपल्या ताअी पोळ आहेत ना–त्या अुभ्या आहेत—

**मालक :** कोण ताअी पोळ?

**भाअी टोळ :** म्हणजे ताअी पोळ तुम्हांला माहीत नाहींत! अखिल महाराष्ट्रांतील महिलावर्गाच्या पुढारी ताअी पोळ–सबंध हिंदुस्थानांत त्यांचं नांव माहीत आहे—

**मालक :** तें कांहीं असलं तरी आम्हांला त्यांना प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय कांहीं सांगतां यायचं नाहीं!

**भोपळे :** बरोबर आहे–दाजीसाहेबांची गोष्ट निराळी. त्यांना आम्ही ओळखतों–पण बायकामाणसांना निवडून द्यायचं म्हणजे निदान अेकदां डोळ्यानं पाहायला तरी पाहिजे! तीन वर्षांतून अेकदां संबंध यायचा!

**मालक :** वाटेल त्या बाअीला मत देण्याअितके आम्ही मूर्ख नाहींत! अहो, मत जायचं तें निदान सत्पात्रीं तरी जायला पाहिजे!

**ढेकणे :** बरोबर आहे–आपल्याला मत नाहीं तरी सांगतों!

**भाअी टोळ :** पांचसहा दिवसांनीं घेअून येअीन त्यांना! कालच त्या दिल्लीला गेल्या आहेत–अखिल भारतीय भाजीवाल्या संघाची परिषद आहे तिथं—

**मालक :** मग ते दहाचं तरी नक्की ना?

**भाअी टोळ :** दहा म्हणजे दहा!

[ प्रमोद येतो. त्याच्या हातांत यादी व पत्रकें आहेत.

**प्रमोद :** दहा! काय–दहा काय?

**भाअी टोळ :** दहा–अं–आपलीं मतं हो! बरे आलांत! हेच ते प्रमोद बरं का–कॉंग्रेसचे फार मोठे कार्यकर्ते आहेत! म्हणजे मी अितका वेळ ज्यांच्यासंबंधीं सांगत होतों—

**मालक :** काय सांगत होता?

**भाअी टोळ :** अहो, असं काय करतां! हे कॉंग्रेसतर्फे या वार्डांत अुभे नाहींत का–त्या दाजीसाहेबांच्या विरुद्ध! तुमचीं सगळीं मतं यांनाच मिळालीं पाहिजेत असं मी सांगत नव्हतों का अितका वेळ–अं! [ डोळे मिचकावतो.

**मालक :** अस्सं-अस्सं–म्हणजे तेच का हे!

**भाअी टोळ :** तेच हे! टाळी द्या! ( प्रमोदला ) यांच्याजवळ दहा मतं आहेत! बरं येतों मी. त्यांना घेअून येअीन पुन्हां! ( प्रमोदला ) तुमच्याबद्दल सगळं मीं

या लोकांना सांगून ठेवलं आहे-तुम्ही अगदीं निर्धास्त असा-( जातां जातां ) दहा बरं का ! [ लांबून दहा बोटं दाखवितो व जातो.

**प्रमोद** : मी या पेठेंत कॉंग्रेसतर्फे अुभा आहें—

**मालक** : भले ! म्हणजे आम्हांला ठाअूकच नाहीं जसं ! अहो, कांहीं झालं तरी आमचीं मतं कॉंग्रेसलाच मिळायचीं ! कॉंग्रेस म्हणजे काय आहे महाराज !

**भोपळे** : कॉंग्रेसनं दगड अुभा केला तरी आम्ही त्याला निवडून देअूं—

**मालक** कॉंग्रेस म्हटलं, कीं आमचं अंतःकरण भरून येतं व हात कपाळाकडे वळतात ! महात्मा गांधी म्हणजे काय चेष्टा आहे ! बापूजींची प्रकृति बरी आहे ना !

**प्रमोद** : हो-असं वाटतं-पण गोष्ट अशी आहे, कीं कॉंग्रेस या म्युनिसिपालिटीच्या निवडणुका प्रथमच लढवीत आहे—

**मालक** : तुम्ही सोडा हो ! कॉंग्रेसच्या विरुद्ध कोणता मायेचा पूत निवडून येतो तें आम्ही पाहतों ! मागल्या कौन्सिल-निवडणुकीच्या वेळीं सोन्यामारुती पक्षाचे तीन तेरा कोणी वाजवले ? ( भोपळे यांजकडे बोट दाखवून ) यांना विचारा !-मग ?-अेक मत मिळालं नाहीं त्यांना या पेठेंत ! तुम्हांला माहीत नाहीं-फार भयंकर आहोंत आम्ही ! कॉंग्रेस म्हणजे कॉंग्रेस ! तुम्ही बेशक घरीं जा ! कॅनव्हासिंग करण्याची तुम्हांला जरूर काय ?

**भोपळे** : 'महात्मा गांधी की जय' म्हटलं कीं सगळीं मतं आपलीं ! तुम्ही अगदीं हिंडूं नका ! खुशाल घरीं बसा. अन् निवडणुकीच्या निकालापर्यंत बाहेर पडूं नका ! त्या दिवशीं हार घेअूनच आम्ही तुमच्याकडे येतों—

**प्रमोद** : म्हणजे चांगला आमच्या प्रेतावर घालायला मिळेल ! छान सांगतां ! अहो, ही निवडणूक आहे-अिथं कोणी कशाची खात्री धरूं नये ! प्रत्येकानं खटपट ही केलीच पाहिजे—

**मालक** : भले ! कसं बोललांत ! खटपट ही तर केलीच पाहिजे ! पण अितर कॉंग्रेस अुमेदवारांपेक्षां तुमची गोष्ट निराळी आहे ! तुमची आमची प्रत्यक्ष ओळख नसली म्हणून तुम्हांला आम्हीं ओळखत नाहीं असं थोडंच आहे ! काय हो !

**भोपळे** : वा ! यांचं नांव म्हणजे काय गोष्ट आहे ! जवाहरलाल, सुभाषबाबू, हे अेकाहीपेक्षां अेक—

**मालक** : तुम्ही आम्हांला भेटला नसतात तरी डोळे झांकून आम्हीं आमचीं मतं तुम्हांलाच टाकलीं असतीं ! अितकं कशाला-दाजीसाहेब अिनामदार परवांपासून

दहा वेळां येअून गेले—हजार रुपयांची थैली ठेवली माझ्यापुढं, आतां बोला! पण मीं साफ सांगितलं त्यांच्या तोंडावर, कीं कॉंग्रेसची मंडळी अुभी असतांना—हें पाप आमच्या हातून करवतां! अुचला थैली! अुचला थैली! तोंडांत खेटर मारल्या-सारखे चालते झाले! बाकी कांहीं झालं तरी खटपट ही तुम्हांला केली पाहिजे. आमची ही पेठ भारी अिरसाल आहे!

**भोपळे :** शिवाय दाजीसाहेबांशीं टक्कर द्यायची म्हणजे कांहीं सामान्य गोष्ट नाहीं! दाजीसाहेब सुलतान आहे या पेठेचा—

**प्रमोद :** तें मला चांगलंच माहीत आहे! म्हणून तर मी प्रत्येक मतदाराला समक्षच जाअून भेटतों आहें—

**मालक :** भले! हेंच करायला पाहिजे! तुम्ही सांगत असाल तर आम्ही देखील तुमच्याबरोबर येतों अुद्यांपासून! कॉंग्रेसचं काम म्हटलं म्हणजे आम्ही आमचीं सारीं कामं बाजूला ठेवूं! प्रश्न आहे काय?

**भोपळे :** तुम्ही यांना आधीं भेटलांत हें फार अुत्तम झालं! यांची मदत असल्यावर तुम्ही निवडणूक जिंकलींत म्हणून समजा! बाकी दाजीसाहेबांना मात्र यंदा पाण्यासारखा पैसा खर्च करावा लागणार!

**मालक :** भले! कसं बोललांत! पण आपण मात्र अेक पैसा खर्च करायचा नाहीं! समजलांत!

**प्रमोद :** तें तर आमच्या पक्षाचं पहिलं तत्त्व आहे. आपण प्राण गेला तरी पैसा देणार नाहीं कुणाला!

**मालक :** भले! लाख बोललांत! या पेठेंत तुम्हांला पैसा खर्च करावा लागला तर तो आमच्या नांवाला बट्टा लागेल! वेळ—प्रसंग आला तर आम्ही पैसा खर्च करूं, पण तुम्हांला आम्ही तोशीस लावूं देणार नाहीं—

**भोपळे :** बाकी दाजीसाहेबांअितकी नसली तरी थोडी फार पैशाची तयारी यांना करून ठेवावी लागेल—

**मालक !** छे—छे!

**भोपळे :** म्हणजे खर्च करायचा नाहीं—पण आपली नुसती तयारी—वेळ आहे, वखत आहे—दाजीसाहेबांनीं दहा रुपयांचा भाव सोडला आहे—

**प्रमोद :** दहा रुपयांचा भाव—म्हणजे काय?

**मालक :** ही अिलेक्शनची भाषा आहे—तुम्ही नवीन आहांत, तुम्हांला माहिती

नाहीं–आमच्या या पेठेंत अेकेका मताला दहा दहा रुपये मोजावे लागतात–लोक फार डांबीस आहेत अिथले. दाजीसाहेबांनींच पूर्वीपासून संवयी लावून ठेवल्या आहेत यांना! त्यापेक्षां तुम्ही दुसऱ्या पेठेंतून अुभे राहिलां असतां कीं नाहीं—

**प्रमोद्** : काय, सांगतां काय तुम्ही?

**मालक** : मग काय तर! अगदीं गाळीव पेठ आहे ही! म्हणून तुम्हांला सांगतों कीं या पेठेंतल्या अेका माणसावर तुम्ही विश्वास ठेवूं नका! तुमच्या तोंडावर अगदीं मिठ्ठास बोलतील–तुम्हांलाच मतं देअूं म्हणतील–वचनं देतील, शपथा घेतील–पण निवडणुकीच्या दिवशीं हातांत पैसे पडल्याशिवाय अेक हरामखोर घरांतून बाहेर पडेल तर शपथ!

**प्रमोद** : मला कल्पना नव्हती या गोष्टीची!

**मालक** : मग काय तर! पण तुम्ही घाबरूं नका! दाजीसाहेबांनीं दहा सोडले तर आपण पांच तर सोडूं!

**प्रमोद्** : छे–छे, पैसे देण्याची ती गोष्टच सोडा. मग बेहेत्तर आहे पडलों तरी—

**मालक** : भले! याला म्हणतात कॉंग्रेसनिष्ठा–पण खरं सांगायचं म्हणजे ही पेठ अशी आहे, कीं प्रत्यक्ष परमेश्वर जरी अिथं अुभा राहिला तरी पैसे सोडल्याशिवाय त्याला अेक मत मिळायचं नाहीं! तथापि कॉंग्रेसचं नांव आहे म्हणून दुसऱ्यापेक्षां आपलं काम थोडक्यांत होअील!

**प्रमोद्** : पण कॉंग्रेसच्या अधिकाऱ्यांची आम्हांला सक्त ताकीद आहे—

**मालक** : जाअूं द्या हो, तें आपलं नुसतं बाहेरून दाखवायला! निवडणुकीला अुभं राहिलं म्हणजे हेंच करतात—पैशाशिवाय कांहीं शक्य नाहीं. हें पहा, तुम्ही असं करा! ( हलक्या आवाजांत ) फार कांहीं नाहीं, अेक हजार रुपये द्या आणून मजजवळ–तुमची निवडणूक मी लढवतों–हें आपलं वचन!

**प्रमोद्** : अेक हजार रुपये!

**मालक** : हजार रुपये म्हणजे कांहीं फार आहेत! आपल्याला त्यांतला अेक कपर्दिक नको. पण काम करायचं म्हणजे माणसं तर नेमायला पाहिजेत. हे आमचे ढेकणे–यांना या पेठेंतलं घर न् घर माहिती आहे. तुमच्या याद्या तयार करायच्या–पत्रं पाठवायचीं–हें काम यांच्यावांचून होणं शक्यच नाहीं. यांना अगदीं कांहीं नाहीं म्हटलं तरी शंभर रुपये तरी द्यायला पाहिजेत.

**ढेकणे :** मला दाजीसाहेब अडीचशें रुपये द्यायला तयार आहेत.

**मालक :** घ्या ! पण आपल्या बाहेर हे नाहींत. त्याशिवाय आणखी दहाबारा माणसं लागतील. त्यांचं चहापाणी, मोटारखर्च, बोर्डछपाअी–छपन्न भानगडी आहेत ! हजाराच्या खालीं आटपणंच शक्य नाहीं !

**भोपळे :** फार कमी सांगितलेत तुम्हीं त्यांना. दाजीसाहेबांशीं गांठ आहे. चेष्टा आहे ? नाकीं नअू येतील यांच्या ! कमींत कमी पांचाची तरी तुम्ही सोय करून ठेवा—

**प्रमोद :** पुन्हां भेटेन तुम्हांला–तोंपर्यंत मी विचार करून ठेवतों.

**मालक :** भले ! विचार करून ठेवा अन् खटपट पण चालू ठेवा–स्वस्थ बसूं नका. ( घराकडे पाहून ) हा कोण घरांत शिरला आमच्या ! आला वाटतं दाजीसाहेबांचा माणूस पुन्हां थैली घेअून. चला हो–पाहूं काय म्हणतोय् तें. ( प्रमोदला ) तुम्ही काळजी करूं नका. कांहीं झालं तरी आमचीं मतं कॉंग्रेसलाच मिळायचीं !

[ जातो. ढेकणेहि जातो. भोपळे जातो नि फिरून परत येतो.

**भोपळे :** ( हलकेंच ) हें पहा, हा माणूस फार बिलंदर आहे–याच्यावर तुम्हीं विश्वास ठेवूं नका. मी तुमचं काम पांचशांत करून देतों–अुद्यां मी तुमच्या घरीं येअून भेटेन—

**प्रमोद :** ठीक आहे. ( भोपळे जातो. ) मनुष्यस्वभाव कळला अशी आतांपर्यंत मला घमेंड होती ! ती या निवडणुकीला अुभे राहिल्यापासून चांगलीच जिरली. निवडणुकीच्या मोसमांत मानवी स्वभावांतला सारा चांगुलपणा अेकदम नाहींसा होअून, अप्रामाणिकता, लुच्चेगिरी आणि स्वार्थसाधूपणा यांची भरमसाट वाढ होते कीं काय कळत नाहीं ! या वेळीं कोणावर विश्वास ठेवावा अन् कोणावर ठेवूं नये हेंच मला कळेनासं झालं आहे !

गहन मनुजहृदय गमतसे भारी,
गगन जेंवि हें अपार !
लोपली कां आज सारी सुजनता !
प्रासी मनुजता आतां कुटिलता !

[ ताअी पोळ येते.

**ताअी पोळ :** बाअी–बाअी–बाअी !— तुम्हांला किती शोधायचं ?

**प्रमोद :** मला ?

**ताअी पोळ :** हो तुम्हांला ! मला ओळखलंत ना—मी ताअी पोळ !

**प्रमोद :** असं का ?—( कृत्रिमपणें हंसून ) नमस्कार ! काय, बोला ?

**ताअी पोळ :** नाहीं—माझं तुमच्याकडे काम होतं ! म्हणजे पितांबर वकिलांनींच मला सांगितलं. पण तुम्हांला हें ठाअूक आहे ना, कीं मी अुभी आहें ?

**प्रमोद :** तुम्ही अुभ्या आहांत ! कुठं ?

**ताअी पोळ :** अिथं !

**प्रमोद :** तें मला दिसतं आहे कीं !

**ताअी पोळ :** तसं नाहीं हो—अिथं म्हणजे या वॉर्डांत बायकांची जागा आहे ना अेक—

**प्रमोद :** असं–असं—म्हणजे निवडणुकीला ! पण तुम्हांला हें ठाअूक आहे ना, कीं प्रमिलाबाअी अुभ्या राहिल्या आहेत त्या जागेसाठीं—

**ताअी पोळ :** तें मला माहीत आहे म्हणून तर मी तुमच्याकडे आलें ! पण तुम्हीं मला वचन दिलं पाहिजेत गडे !

**प्रमोद :** गडे !! —कसलं वचन ?

**ताअी पोळ :** तें नाहीं आम्हीं सांगत–तुम्ही आधीं अेक वचन द्या !

**प्रमोद :** अहो, अेकवचन काय अनेकवचन देअीन ! पण कशाबद्दल ?

**ताअी पोळ :** सांगूं मग–पहा ! तुम्ही माझ्यासाठीं प्रमिलाबाअींना खालीं बसायला सांगा !

**प्रमोद :** छे–भलतंच ! तें शक्य नाहीं ! मी तिला सांगणार नाहीं—अन् मीं सांगितलं तरी ती अैकणार नाहीं. परवांच झालं तें !

**ताअी पोळ :** म्हणजे तें भांडण !

**प्रमोद :** भांडण ! कुणी सांगितलं तुम्हांला ?

**ताअी पोळ :** कुणी सांगितलं ?—सगळ्या गांवांत झालं आहे तें ! तुमचं लग्न ठरलं आहे ना ?

**प्रमोद्** : हो— तसं कांहीं नाहीं—पण तसंच जवळ जवळ—

**ताअी पोळ** : मग तुम्हीं हें लग्न मोडून टाका.

**प्रमोद्** : छान ! अन् काय करूं—?

**ताअी पोळ** : तुम्हीं माझ्याशीं—नाहीं—मला मदत करा या निवडणुकींत.

**प्रमोद** : वेड लागलंय् तुम्हांला ? आलांत तशा जा ! माझ्याकडून तुम्हांला कांहीं अेक मदत होणार नाहीं.

**ताअी पोळ** : हें काय गडे असं ! नाहीं तुम्ही मला मदत करणार ?

[ अेकदम हुंदके द्यायला लागते.

**प्रमोद्** : म्हणजे ! हें हो काय झालं ? अहो, रडतां काय—

**ताअी पोळ** : ( रडत रडत ) तुम्ही मला मदत करणार नाहीं तर देशाला स्वराज्य कसं मिळणार ?

[ प्रमोद जवळ जाअून तिची समजूत घालतो—ती जास्तच रडते—तोंच प्रमिला रागांत प्रवेश करते.

**प्रमिला** : चांगलेच सांपडलांत ! हीच ती !

**प्रमोद्** : ती ! कोण ती ?

**प्रमिला** : भररस्त्यावर हे प्रकार ! कांहीं लाजलज्जा आहे का तुम्हांला ? अन् लग्नाचं वचन दिलं आहे मला !

**ताअी पोळ** : हीच का तुमची ती ?

**प्रमिला** : हो–हो–तीच बरं मी !

**प्रमोद्** : बाजूला हो–वेड लागलंय् काय तुला ?

**प्रमिला** : तुम्हांला वेड लागलंय् ! अितके नीच असाल तुम्ही याची मला कल्पना नव्हती ! माझी फजिती करण्यासाठीं तुम्हीं हिला अुभी केलींत ?

**प्रमोद्** : मीं ? हिला अुभी केली ? डोकं फिरलंय् तुझं !

**ताअी पोळ** : हो, यांनींच मला अुभं केलं–मग काय म्हणणं आहे तुझं ?

**प्रमिला** : हें घ्या !

**प्रमोद्** : खोटं काय बोलताय् ? माझी हिची ओळख तरी !

**प्रमिला** : ओळख नाहीं म्हणतां अन् भर रस्त्यावर प्रेमाच्या कानगोष्टी करीत अुभे राहतां ?

**प्रमोद** : आतां काय सांगावं ! अितक्यांत मला भेटली ही—

**प्रमिला** : पुरे, पुरे—तुम्हीच तिला घेअून त्या संपादकाच्या कचेरींत गेलांत—तिथं जाअून वाटेल तो फाजिलपणा केलांत—माझा मॅनिफेस्टो अन् फोटो छापूं नका म्हणून सांगितलंत—

**प्रमोद** : साफ खोटं आहे—

**ताअी टोळ** : अगदीं खरं आहे हें !

**प्रमिला** : अेकूण अेक पुरावा आहे माझ्याजवळ. तुम्ही काय समजलांत ! तुमचीं सारीं कुलंगडीं मला कळलीं आहेत आतां ! कोणकोणत्या बायकांना प्रेमाचीं वचनं देअून तुम्हीं फसविलंत—कोणाकोणाचे पैसे घेअून त्यांच्याशीं विश्वासघात केलांत—

**प्रमोद** : कोणत्या हरामखोरानं हें सांगितलं तुला ?—

**प्रमिला** : तुरुंग-वॉरंट निघेल तेव्हां कळेल ! माझ्याशीं विश्वासघात करणाऱ्याचं कधीं चांगलं व्हायचं नाहीं । तुम्ही बऱ्या बोलानं आपलं नांव मागं घ्या—अन् हिला खालीं बसवा !

**ताअी पोळ** : तर—तर—मी बसतें ! हेहि बसणार नाहींत अन् मीहि बसणार नाहीं ! नाहीं का हो ?

**प्रमोद** : तूं गप्प बस. कसला सैतान शिरला आहे तुझ्या डोक्यांत आज ? शांत हो आणि घरीं चल आधीं—

**प्रमिला** : हिचा निवडणुकींत निकाल लावल्याशिवाय माझं डोकं आतां शांत होणार नाहीं.

[ ताअी पोळचा हात पकडते.

**प्रमोद** : प्रमिला, मागं सर—

**प्रमिला** : माझ्याविरुद्ध अुभी राहतेस—

**ताअी पोळ** : राहणार—राहणार—तुझी कांहीं भीति आहे ?

**प्रमोद** : अहो ताअी, आतां काय करावं ! अहो टोळ, बरे दिसलांत—धांवा लौकर ( भाअी टोळ येतो. ) हें तुमचं प्रकरण आवरा !

**भाअी टोळ** : अर्रर ! हें काय ? मला दिसलंच नाहीं ? मला वाटलं—म्हशींची टक्कर चालली आहे ! ( ताअी पोळचा हात धरून ) सर मागं !

**प्रमोद** : ( प्रमिलेचा हात धरून ) चल घरीं !

**प्रमिला :** बऱ्या बोलानं तूं बस—

**ताअी टोळ :** तुला हवं असेल तर तूं बस—

**प्रमोद :** कशी निवडून येतेस तें पाहतें !

**ताअी टोळ :** तूं कशी येतेस तें मी पाहतें !

**भाअी टोळ :** ( ताअी पोळला ओढून नेतांना ) माझे आअी, चल आतां-

[ जातात.

**प्रमिला :** ( प्रमोदला ) तुम्ही चालते व्हा—माझ्या प्रेमाचा—माझ्या सर्वस्वाचा घात केलांत तुम्हीं ! यापुढं तुमचं तोंड पाहायची माझी अिच्छा नाहीं.

प्रेम विषारी !
मारी जिव्हारीं सुरा, माझ्या !
कळला ना कसाअी कावा ! जीवा !
दावुनि राया, फसवी माया
जिव भोळा, केला खुळा !
मग कां हा कसाअी कावा, केला !

## [ ३ ]

दाजीसाहेबांचा दिवाणखाना. पिलोबा बलदेवला घेअून प्रवेश करतो.

**पिलोबा :** अुभे रहा अिथं. मी हांक मारतों बाअीसाहेबांना—

[ पिलोबा आंत जातो. थोड्या वेळानें तो नि गिरिजा नि नंदू बाहेर येतात.

**गिरिजा :** पिलोबा, तुम्ही बाहेर जा. दरवाजाजवळ अुभे राहूं नका. कोण काय बोलतं आहे हें चोरून अैकण्याची वाअीट खोड आहे तुम्हांला.

**नंदू :** हो, मला ठाअूक आहे. नेहमीं दाराला कान देऊन अुभे असतात. चला बाहेर—मी ठेवतों यांच्यावर पाळत.

[ पिलोबाचें अुपरणें ओढीत नंदू त्याला बाहेर नेतो.

**बलदेव** : कां बोलावलंत मला ?

**गिरिजा** : काल रात्रीं तुमच्या चाळींतल्या भाडेकरी लोकांची सभा होती—

**बलदेव** : कुणी सांगितलं तुम्हांला ?

**गिरिजा** : तें काय करायचंय् ? खरं आहे ना ? काय ठरलंय् तुमचं ?

**बलदेव** : कशाबद्दल ?

**गिरिजा** : निवडणुकीबद्दल ! कुणाला मतं देणार तुम्ही ?

**बलदेव** : कुणाला म्हणजे ?—अर्थात् दाजीसाहेबांना ! खुद्द मालक अुभे असतांना—

**गिरिजा** : माझ्याशीं खोटं बोलायचं कारण नाहीं तुला ! मला सगळं ठाअूक आहे तुमचं काय ठरलंय् तें !

**बलदेव** : मग, माझ्या तोंडूनच तें वदवण्यांत काय हंशील आहे ? आम्ही गरीब माणसं—तुमच्यासारख्या श्रीमंतांच्या मेहेरबानीवर जगणारीं—कां आम्हांला नसत्या संकटांत घालतां ?

**गिरिजा** : तूं अजून मला पुरतं ओळखलं नाहींस ! गरिबांचीं अंतःकरणं मला चांगलीं कळतात !—माझा जन्म गरिबींतच झाला आहे ना ! तुम्ही भाडेकरी लोक आमच्या घाणेरड्या चाळींत राहायला जितके कंटाळला नसाल तितका कंटाळा—तितका वीट—मला या घरांत शिरलेल्या वातावरणाचा आला आहे ! तुम्ही म्युनिसिपालिटींत जाअू नका, म्हणून जीव तोडून मी यांना सांगतें आहे अितकीं वर्षं—

**बलदेव** : खरंच सांगतां तुम्ही ! मग आमचं अंतःकरण तुमच्याजवळ अुघड करायला हरकत नाहीं ! श्रीमंतीचा माज चढला आहे यांना ! आम्ही गरीब असलों म्हणून किती वर्षं यांच्या पायाखालीं तुडवले जाअूं ? पांच रुपयांची नोट फेंकली, कीं गरिबाचं व्होट विकत घेतां येतं अशी यांना घमेंड चढली आहे—निवडणुकीच्या दिवशीं कळेल सारं—

**गिरिजा** : तुमचीं सारीं मतं प्रमोदलाच मिळायला पाहिजेत !

**बलदेव** : डोळे झांकून आम्ही आमचीं मतं कॉंग्रेसच्याच अुमेदवाराला देणार—

**गिरिजा** : पहा बरं—नाहीं तर पैशाच्या मोहाला बळी पडाल !

**बलदेव** : तें नांवच काढूं नका ! पैसे देअून गरिबांना विकत घेतां येतं अशी य

श्रीमंत लोकांनीं आजपर्यंत आमची बदनामी केली आहे. हा आमच्या अब्रूला लागलेला बट्टा या निवडणुकींत आम्ही धुअून टाकणार !–पण यांतलं अेक अक्षर देखील त्यांच्या कानांवर जातां कामा नये.

**गिरिजा** : त्याची तुम्ही काळजीच करूं नका ! या निवडणुकीच्या निकालावर माझ्या संसाराचं सारं सुख अवलंबून आहे. माझं स्वत:चं मतसुद्धां मी कॉंग्रेसलाच देणार ! कॉंग्रेसला विरोध करणाऱ्या अुमेदवारांच्या बायका देखील त्यांना मतं द्यायला तयार नाहींत, हें दृश्य मला जगाला दाखवायचं आहे.

अवगणिती पतिला योषिता !
जनहित न करि, वरित जो स्वार्था !
प्रिय न जयाला भारतमाता,
कां असले नर घडवि विधाता !

[ गोवर्धन अेका हातांत हार नि दुसऱ्या हातावर शालजोडी असा प्रवेश करतो. त्याच्याबरोबर भीमाशंकर आणि चक्रदेव आहेत.

**भीमाशंकर** : अेक हजार ! अहो, पांच हजार लोक हजर होते !

**चक्रदेव** : अेवढा टोलेजंग समारंभ पाहिलाच नव्हता आपण कधीं !

**गोवर्धन** ( गिरिजास ) बघतेस काय आ वासून ! शंकराचार्यांनीं आज आम्हांला आशीर्वाद दिला ! नगरेश्वर ही पदवी दिली ! आणि हजारों लोकांच्या समोर हें महावस्त्र अर्पण केलं ! आतां कॉंग्रेसच्या बापाला भीत नाहीं आम्ही !

**भीमाशंकर** : कॅंग्रेसचं नांवच काढूं नका आतां ! आज कॅंग्रेसचं नाक आम्हीं ठेचलं आणि कॅंग्रेस या शहरांत होती कीं नव्हती करून टाकली !

**चक्रदेव** : आज गांवांत खादीची टोपी औषधाला दिसत नव्हती. जिकडे तिकडे भगव्या टोप्या–पगड्या नि शालजोड्या !

**भीमाशंकर** : अन्–सोन्यामारुती पक्षाचा जयजयकार ! दुसरी भाषा अैकूं येत नव्हती ! मी सांगतों तुम्हांला आज वर्ध्याला न् शेगांवाला धरणीकंप होणार !–अन तुम्ही आम्हांला सांगत होतां हा समारंभ करूं नका !

**चक्रदेव :** पण मला काल नक्की बातमी लागली होती कीं, काँग्रेसवाले आजचा समारंभ अुधळून टाकणार म्हणून—

**गोवर्धन :** मलाहि पहिल्यापासून तीच धास्ती वाटत होती !

**भीमाशंकर :** काय छाती आहे त्यांची ! सनातन्यांची शालजोडी पाहिली, कीं खादीचा पंचा असा फडफड अुडायला लागतो ! दंगा करण्यासाठीं सभेंत घुसलेले टोळभैरव थोबाडींत मारल्यासारखे चेहरे करून पसार झाले ! काँग्रेस-सभासदांची वाढती संख्या हे कॉंग्रेसचं वाढतं बळ नसून काँग्रेसची वाढती सूज आहे. शेवटीं सोन्यामारुती पक्षाचंच राजकारण यशस्वी ठरणार !

**चक्रदेव :** निवडणुकीचा निकाल आज लागला म्हणून समजायला हरकत नाहीं !

**गोवर्धन :** आपण निवडून तर येणारच येणार, पण यंदा नगराध्यक्ष होणार ! शंकराचार्यांचं भविष्य खरं ठरणार ! बारा वर्षांत जें आपल्याला साधलं नाहीं तें यंदा साधणार ! ( गिरिजाला ) आणि ही म्हणत होती अुभे राहूं नका म्हणून ! पिलोबा, आजपासून घरावर भगवा झेंडा अुभारा ! नाहीं तर अेका काठीला ही शालजोडी बांधून तिची गुढी घरावर लावा—अेक डझन भगव्या टोप्यांची ऑर्डर द्या आतांचे आतां—बोला बलदेव, झाली तुमच्या चाळीची दुरुस्ती ?—

**बलदेव :** होय साहेब.

**गोवर्धन :** अगदीं मनाप्रमाणं ! मोऱ्या, नळ, संडास, दिवे, खिडक्या काय पाहिजे असेल तें मागून घ्या या वेळीं ! मागून तक्रार नको—झरा वाहतो आहे या वेळीं ! हात धुअून घ्या—आणि ही म्हणत होती अुभे राहूं नका म्हणून !

**भीमाशंकर :** छे छे, साफ चुकलं असतं ! तुम्ही नसतां तर सोन्यामारुती पक्षाच्या राजकारणाचा धुव्वा अुडाला असता !

**गिरिजा :** वेड लागलं आहे तुम्हां सर्वांना ! खोट्या प्रतिष्ठेच्या नादीं लागून तुम्ही आपल्या घरादारांचा नाश करीत आहांत ! तुमच्या तोंडावर तुमच्या स्तुतीचे पोवाडे गाणारे हे—हे तुमचे तोंडपुजे लोक तुमची दिशाभूल करून स्वतःच्या पोतड्या भरीत आहेत हें तुम्हांला कसं कळत नाहीं ! कुठला कोण शंकराचार्य काढला आहे—

**गोवर्धन :** भलभलतं काय बडबडतेस ! शंकराचार्य म्हणे कुठला कोण !

**गिरिजा :** कोण विचारतंय् शंकराचार्याला आज ! अन् त्याला म्युनिसिपालिटीचं

काय कळतंय् डोंबलं ! ना बायको ना पोर–ना संसार ! दुसऱ्याच्या संसारावर तुळशीपत्र ठेवणारे हे !–आशीर्वाद द्यायला त्याला काय होतं ! म्हणे शालजोडी मिळाली ! बाहेर जगांत जा–म्हणजे शालजोडीतले मिळतील !

**गोवर्धन :** जगांत काय चाललंय् तें तुला काय कळतंय् ! तूं घरांत जा ! अन् चुलीपाशीं बस–मूर्ख कुठली—

**गिरिजा :** हो–चुलीपाशीं जाऊनच बसायला पाहिजे मला आतां ! कारण तुमची अक्कल आतां चुलींत जाण्याचा फार संभव आहे—

[ तणतणत निघून जाते.

**गोवर्धन :** छे–छे, या बायका म्हणजे—

**भीमाशंकर :** जाऊं द्या हो, चालायचंच हें ! मग काय बलदेव, मतांचा बंदोबस्त पक्का झाला आहे ना ?

**बलदेव :** आतां प्रश्नच नाहीं ! तीनशेंच्या तीनशें मतं साहेबांनाच पडायचीं ! आज बारा वर्षांची वहिवाट आहे ही !

**चक्रदेव :** मला आतांचे आतां जाऊन 'शंकराचार्य स्पेशल अंक' काढायला पाहिजे–दहा हजार कॉपी काढतों–प्रत्येक घरोघर शंकराचार्यांचा संदेश पोंहोचला पाहिजे !

**गोवर्धन :** दहा हजार काय–अेक लाख कॉपी काढा ! या समारंभाची बातमी साऱ्या हिंदुस्थानांत कानाकोपऱ्यापर्यंत पसरली पाहिजे ! कॉंग्रेसची भंबेरी आम्हीं अिथं कशी वाजवली हें साऱ्या जगाला कळलं पाहिजे !

**चक्रदेव :** हो–कालचं सांगायचं विसरलों–प्रमोद आणखी कॉंग्रेसची कांहीं व्यापारी मंडळी माझ्याकडे आली होती–पांच हजार रुपये रोख द्यायला तयार होते–हे होतेच कीं तिथं—

**भीमाशंकर :** अन् वल्लभभाअींचं का त्या जमनालाल बजाजचं पत्रहि आणलं होतं बरोबर !

**चक्रदेव :** पण आपण त्यांना साफ सांगितलं–शेंडी तुटो वा पारंबी तुटो–आतां शेवटपर्यंत आपण सोन्यामारुती पक्षाचं राजकारणच लढवणार !–बरं मला सांगायचं होतं तें तसंच विसरलों,–आज आमच्या छापखान्यांत पगाराचा दिवस

आहे अन् मागली कांहीं बिलंहि द्यायचीं आहेत कागदवाल्यांचीं–अेक हजाराचा चेक दिलांत तरी भागेल.

**भीमाशंकर :** हो, अन् शंकराचार्यांनीं काढलेल्या 'स्वधर्मरक्षण' फंडालाहि आपल्याला–कांहीं नाहीं तरी हजार दोन हजार द्यायला पाहिजेत—

**गोवर्धन :** पिलोबा, माझं फाउन्टनपेन आणा! (टेबलाशीं बसून) पैशाचा प्रश्न नाहीं सध्यां! म्युनिसिपालिटींत गेल्यावर अेका वर्षांत हा सारा खर्च भरून काढीन. (चेक लिहींत) किती?–अेक हजार–हें घ्या! (चक्रदेवाला चेक देतो.) चेक शंकराचार्यांच्या नांवावर लिहूं कीं काय?—

**भीमाशंकर :** नाहीं—माझ्या नांवावर लिहिला तरी चालेल!

**गोवर्धन :** दीड हजार! हा घ्या!

[ भीमाशंकरला चेक देतो.

**भीमाशंकर :** राजकारण खेळायचं म्हणजे पैसा पाण्यासारखा खर्च करावा लागतो!–तुम्ही आहांत म्हणून आमचा पक्ष आज जिवंत आहे–अन् मघांशीं बाअीसाहेब म्हणाल्या—

**गोवर्धन :** जाअूं द्या हो.

**भीमाशंकर :** आमच्या अंतःकरणाला फार लागले शब्द ते! सोन्यामारुतीची शपथ घेअून सांगतों–यांतल्या अेका छदामाला स्पर्श केला तर—

**गोवर्धन :** अहो, बायकांचे शब्द–काय मनावर घ्यायचे आहेत!–बोला बलदेव, आतां कां तुम्ही थांबलांत?

**बलदेव :** आपल्या चाळीसमोर मारुतीचं देअूळ आहे–फार जुनं स्थान आहे–आतांपर्यंत त्याच्याकडे कोणी बघितलं नव्हतं–भिंती पडल्या आहेत–पत्रेहि अुडाले आहेत–भाडोत्री मंडळींचं असं म्हणणं आहे–या वेळीं तरी या देवळाचा जीर्णोद्धार व्हायला पाहिजे—

**गोवर्धन :** अगदीं योग्य! किती खर्च येअील? दोनशें–तीनशें–चारशें—

**भीमाशंकर :** मी जाअून पाहतो तें–मजजवळ पैसे द्या—

**बलदेव :** आतां मेहेरबानी करा कीं! पांचशांपर्यंत खर्च येअील–आणि चाळीच्या आवारांत अेक तालमीचा हौदा बांधावा असंहि मंडळींचं मत आहे; म्हणजे पोरांना

मेहनत करायला—कसरत करायला जागाच नाहीं आतांपर्यंत. हें काम थोडक्यांत म्हणजे तीनशें रुपयांत होओील !

**गोवर्धन** : हा हजाराचा चेकच घेऊन ठेवा म्हणजे झालं !

[ चेक लिहून त्याला देतो.

**बलदेव** : येतों मी ! मताची तुम्ही काळजीच करूं नका !

[ जातो.

**चक्रदेव** : काय खर्च हा ! आपली तर छातीच दडपली !

**भीमाशंकर** : त्याला दाजीसाहेबांचं धैर्य पाहिजे ! तुमचीं आमचीं कामं नव्हत हीं ! आम्हीं आपली नुसती नमस्कारावर निवडणूक लढवावी !

[ पितांबर, प्रमिला, भाओी टोळ येतात.

**पितांबर** : निवडणूक फत्ते ! टाळी द्या !

**भीमाशंकर** : या पितांबर. अरे, तुमची गाडी वाजली नाहीं !

**चक्रदेव** : ओका मैलावरून तुमच्या गाडीचा आवाज ओकूं यायचा !

**पितांबर** : आमचा खटारा कालच विकला ! कोरं मॉडेल् घेऊन आलों आहे फोर्डचं ! काय प्रमिलाताओी, कशी गाडी आहे ?

**भाओी टोळ** : अशी गाडी बसायला मिळल्यावर आणि असली मंडळी शेजारीं बसायला मिळाल्यावर छपन्न ओिलेक्शनं लढवून दाखवूं आम्ही !

**पितांबर** : रोज रोज भाडोत्री टॅक्सीचा खर्च करण्यापेक्षां, म्हटलं कोरीच गाडी घेऊन टाकावी म्हणजे झालं !

**गोवर्धन** : हें छान केलंत !

**पितांबर** : मग काय तर ! त्याचं बिल येओील कंपनीकडून तुमच्याकडे ! चार हप्त्यांनीं दिलं तरी चालेल !

**गोवर्धन** : ( प्रमिलेस ) पण या कशा ओिकडे ?

**पितांबर** : तुम्ही ओिकडे या जरा—

[ गोवर्धन व पितांबर बाजूला जातात.

**भीमाशंकर** : काय हो भाओी—तुम्ही कसे ओिथं ?

**चक्रदेव** : म्हणजे तुम्हांला ठाऊक नाहीं ? अहो, हे आपले कार्यकर्ते आहेत !

**भीमाशंकर** : काय म्हणतां ! हा—हा सोन्यामारुती पक्षाचा खरा विजय आहे !

अेक वेळ मियाभाअी आम्हांला येअून मिळतील, पण हे चोळणेभाअी मिळणं अशक्य आहे !

**गोवर्धन :** काय म्हणतां ? मला हें खरं वाटत नाहीं !

**पितांबर :** मग काय तर ! आतां निवडणूक अगदीं बिनविरोध !

**गोवर्धन :** भीमाशंकर, सोन्यामारुती पक्षाचा हा दुसरा विजय घ्या ! प्रमिलाबाअी आपल्या पक्षातर्फे अुभ्या राहाणार !

**भीमाशंकर :** सोन्यामारुती की जय ! आतां तुमचे आभार तरी कसे मानूं !

**भाअी टोळ :** माझे आभार माना तुम्ही आधीं ! यांची निवडणूक अगदीं बिनविरोध करतों म्हणून मी यांना आश्वासन दिलं तेव्हां या तुमच्या पक्षातर्फे अुभ्या राहायला तयार झाल्या ! ताअी पोळची मला समजूत घालावी लागेल—अर्थात अेका अटीवर !

**पितांबर :** ती सगळी व्यवस्था आम्ही करूं हो !

**भाअी टोळ :** करूं नाहीं—आत्तां करा ! (दोन बोटें दाखवून) निदान दोन तरी लागतील !

**चक्रदेव :** हें सारं मला आतांचे आतां छापायला पाहिजे ! आज मला किती जादा पुरवण्या काढाव्या लागणार आहेत कोणास ठाअूक !

**गोवर्धन :** प्रमोदच्या विरुद्ध अेवढा भरभक्कम पुरावा हातांत असल्यावर ठिकऱ्या अुडवून टाकूं त्याच्या ! अन् त्या दिवशीं मला चारित्र्याच्या गोष्टी सांगत होता ! पण प्रमिलाबाअी, तुम्ही मात्र आतां बदलतां कामा नये !

**प्रमिला :** ती तुम्ही भीतीच बाळगूं नका ! प्रमोदचं खरं स्वरूप आतां मला पुरतं कळून चुकलं—प्रमोदचा न् माझा कांहीं अेक संबंध नाहीं आतां—

**पितांबर :** कॉंग्रेसच्या गड्डयाला आपण आज हात घातला म्हणून समजा ! प्रमोद म्हणजे आज कॉंग्रेसचा जीव कीं प्राण आहे ! त्या प्रमोदचं हें काळीजच काढून आणलं आहे आपण —कॉंग्रेस आतां गडगडली म्हणून समजा—

**भाअी टोळ :** आणि बाहेर आमचं कॅन्व्हासिंगचं काय काम चाललं आहे हें नाहीं तुम्हीं विचारलंत ? अेक लाख हस्तपत्रकं खपलींत ! तुमचा जाहीरनामा छापून काढायला पाहिजे आतां !

**गोवर्धन :** कांहीं जरूर नाहीं आतां तसल्या जाहीरनाम्याची ! आमचा जाहीरनामा नाशिकच्या सिक्युरिटी प्रिंटिंग प्रेसमध्यें छापतो आहे हल्लीं !

**चक्रदेव** : म्हणजे काय ?

**गोवर्धन** : नाहीं तुमच्या ध्यानांत आलं ? दहा रुपयांची कोरी करकरीत निळी नोट हा आमचा जाहीरनामा ! अगदीं निरक्षर माणसाला देखील वाचतां येअील असा हा आमचा जाहीरनामा आहे. अडाणी लोक अेखाद वेळीं मला ओळखावयाचे नाहींत; पण निदान जॉर्ज बादशहाला तरी ओळखतील कीं नाहीं ?

**भाअी टोळ** : तें काम आमचं चालूच आहे. (जिथं जाल तिथं यांचा नागोबा आणि दहाचा आंकडा)! दुसरी भाषा अैकू यायची नाहीं. प्रत्येक कोपऱ्याकोपऱ्यावर वीस वीस फुटांचे बोर्ड लावले आहेत. कमीत कमी पांच हजार मतं सॉलिड आहेत आपल्याला !

**चक्रदेव** : पांच हजार !

**भाअी टोळ** : मग काय तर ? नुसतीं गजानन महंमद देवाचींच तीनशें मतं !

**भीमाशंकर** : कोण गजानन महंमद ?

**भाअी टोळ** : फार मोठे पुढारी आहेत ते !

**गोवर्धन** : पण आपल्या वाडींत सारे मतदार आहेत तीन हजार ! अन् पांच हजार मतं कुठून आणलींत ?

**भाअी टोळ** : पांच हजार कोण म्हणालं ! तीन हजार म्हणालों मी ! बरं, आपल्याला अेक हजार रुपयांचं तरी मीठ खरेदी करून ठेवावं लागेल ! कारण अिलेक्शन जसजसं जवळ येअील तसतसा गांवांतला मिठाचा भाव वाढायला लागेल !

**प्रमिला** : मीठ कशाला ?

**गोवर्धन** : मतदारांच्या हातांत मीठ देअून शपथा घ्याव्या लागतात ! मिठाचं पाहूं पुढं. प्रमोद बसला तर निवडणूक बिनविरोध फत्ते ! मग मिठाअैवजीं साखरच खरेदी करून वांटायला लागेल साऱ्या मतदारांना !

**पितांबर** : ती काळजीच तुम्ही करूं नका ! प्रमोद कसा बसत नाहीं तें आम्ही पाहतों.

**चक्रदेव** : आजपासून ‘ दुष्काळ ’ पत्रांत प्रमोदवर अग्रलेखाची तोफ डागायला सुरुवात करतों.

**भीमाशंकर** : ह्या आपल्याला मिळाल्यावर आतां प्रमोदचा अन् कॉंग्रेसचा निकाल लागलाच म्हणून समजा !

[ प्रमोद प्रवेश करतो.

**प्रमोद** : प्रमोदचा निकाल—अन् काँग्रेसचा निकाल ! सोन्यामारुतीभोंवतीं नाचणारीं तुमच्यासारखीं माकडं आमचा निकाल लावणार ?

**बलदेव** : पिलोबा, काय करतांय् तुम्ही ? कसा शिरला हा आंत—बाहेर हो आधीं तूं.

**प्रमोद** : प्रमिलेला घेतल्यावांचून मी अिथून हालणार नाहीं.

[ गिरिजा आंतून येते.

**गिरजा** : कोण प्रमोद—प्रमिला !

**प्रमोद** : प्रमिला, तुला वेड लागलंय् का ? ही मंडळी धडधडीत तुझ्या डोळ्यांत धूळ टाकून तुला फसवताहेत ! मुकाट्यानं माझ्याबरोबर चल—

**प्रमिला** : तुम्ही मला समजतांय् काय ? तुम्हांला तेवढी अक्कल आहे अन् मी मात्र मूर्ख आहे ! माझं कल्याण कशांत आहे हें मला नीट समजतं—चालते व्हा तुम्ही अिथून.

**गिरजा** : प्रमिला, तूं—तूं हें बोलते आहेस ! अन् प्रमोदला ? काय, झालं तरी काय तुला ! कसली धुंदी चढली आहे !

**गोवर्धन** : तूं बाजूला हो—तिच्याशीं बोलूं नकोस !

**गिरिजा** : गप्प बसा तुम्ही ! ही—ही पाहिलीत निवडणूक ! भावाभावांत, बापलेकांत, नवराबायकोंत, मित्रामित्रांत, प्रेमाच्या नात्यांत जन्माचं विष कालवणारी ही पाहिलीत निवडणूक ? अजून शुद्धीवर या अन् या निवडणुकीच्या नरकांतून बाहेर पडा !

**गोवर्धन** : मला सांगण्यापेक्षां या—या तुझ्या लाडक्या भावाला सांग. प्रमोद, तुला आतां अुघड आव्हान देतों ! बऱ्या बोलानं तूं या निवडणुकींतून आपलं नांव माघारी घेतलं नाहींस तर तुझ्या आयुष्याची धूळधाण करण्याअेवढा जबरदस्त पुरावा आमच्या हातांत आहे.

**गिरिजा** : तुम्ही—तुम्ही याच्या आयुष्याची धूळधाण करणार ?

**गोवर्धन** : कां करणार नाहीं ? ही लढाअी आहे—अन् हा माझा दुष्मन् आहे—

**प्रमोद** : तुमच्या असल्या पोकळ धमक्यांनीं घाबरणारा मी नाहीं ! काय माझ्याविरुद्ध तुमच्याजवळ पुरावा असेल तो बाहेर काढा ! अगदीं पालखींत ठेवून त्याची गांवांतून मिरवणूक काढा !

**चक्रदेव :** पहा बरं ! तुमच्या हातची लेखी पत्रं आहेत. अेक नाहीं—दोन नाहीं—पांचपन्नास आहेत !

**प्रमिला :** मीं डोळ्यांनीं पाहिलं आहे तें बंडल !

**प्रमोद :** तूं वाचलीं आहेस तीं ? हें सांगतील त्याच्यावर विश्वास ठेवायला शरम वाटत नाहीं तुला ?

**पितांबर :** दोन हजार रुपयांची फिर्याद आहे माझ्याजवळ तयार; पैशाच्या विश्वासघाताची !

**प्रमोद :** सार्वजनिक संस्थेसाठीं कर्जाअू काढलेली रक्कम म्हणजे माझं स्वतःचं कर्ज नव्हे ! येअूं द्या फिर्याद कोर्टांत—म्हणजे तुमचींहि कुलंगडीं मी बाहेर काढतों ! प्रमिला, बऱ्या बोलानं तूं माझ्याबरोबर चल.

**गिरिजा :** प्रमिला, तूं स्त्री आहेस—निवडणुकीसाठीं तूं आपल्या प्रेमाचा—आपल्या सर्वस्वाचा नाश करूं नकोस !

**प्रमिला :** तुम्ही मला अक्कल शिकवूं नका.

**गिरिजा :** मला अुलटून बोलतेस ? चल चालती हो अिथून ! माझ्या घरांत अेक क्षणभर तुला राहूं देणार नाहीं मी !

**गोवर्धन :** हें माझं घर आहे ! तिला सांगण्याचा तुला कांहीं अेक हक्क नाहीं ! निवडणूक होअीपर्यंत ती या घरांत राहाणार !

**गिरिजा :** मग मी या घरांतून चालती होतें !

**गोवर्धन :** खुशाल ! घराचा दरवाजा तुला मोकळा आहे !

**गिरिजा :** अस्सं ! मग अशीच्या अशी या घरांतून चालती होतें ! पाहूं तुमची निवडणूक तुम्ही कशी लढवतां तें ! साऱ्या गांवांत—साऱ्या रस्त्यांतून—साऱ्या चौकांतून तुमच्या नांवाचा डांगोरा पिटतें ! तुम्हीं प्रमोदचीं कुलंगडीं बाहेर काढणार काय ? मग तुमच्या साऱ्या भानगडी मी बाहेर काढतें !

**गोवर्धन :** तूं माझ्या विरुद्ध एक अक्षर तर बोल—

**गिरिजा :** तुमची भीति आहे मला ? माझ्या संसाराचा—माझ्या घरादाराचा नाश करतां आहांत तुम्ही ! आतां मी तोंड मिटून गप्प बसूं ?

**गोवर्धन :** काय सांगणार तूं माझ्याविरुद्ध ? तुझ्या
ठेवणार ?

**गिरिजा :** अस्सं ! पहा बरं ! ड्रेनेजच्या योजनेंत अेक लाख रुपये तुम्ही—

**भीमाशंकर :**
**पितांबर :**
**चक्रदेव :** } काय म्हणतां !

**गोवर्धन :** चांडाळणी—जीवच घेतों तुझा !

[ तिच्या अंगावर धांवून जातो. प्रमोद नि इतर मंडळी गोवर्धनला अडवतात.

**गिरिजा :** माझा गळा दाबलांत म्हणून सत्याची गळचेपी होओील कधीं ?

**गोवर्धन :** गप्प बस ! अेक अक्षर बोलूं नकोस ! हें सारं-सारं खोटं आहे ! हिला वेड लागलं आहे ! तुम्ही हिच्यावर विश्वास ठेवूं नका !

[ आंतून—' कॉंग्रेसला मते द्या ! ' ' सोन्यामारुती पक्षाचा धिक्कार ! ' अशा गर्जना.

**गोवर्धन :** पिलोबा, बघतां काय ! हांकून द्या त्या लोकांना ! कॉंग्रेसला मत देअूं नका ! बोला, सोन्यामारुती पक्षाला मतं द्या ! बोला—बोला.—

[ पितांबर, भीमाशंकर नि भाओी टोळ ' सोन्यामारुती पक्षाला मतं द्या ! ' असें ओरडतात. अितक्यांत नंदू तिरंगी झेंडा घेऊन धांवत धांवत आंत येतो.

**नंदू :** कॉंग्रेसला मतें द्या—कॉंग्रेसला मते द्या—

**गोवर्धन :** खबरदार असं बोलशील तर ! कुणी शिकविलं तुला हे ! मी तुझा बाप इथं उभा राहिलों आहे अन् कॉंग्रेसला मतं द्या म्हणून म्हणतो आहेस—फेंकून दे तो झेंडा—

**नंदू :** नाहीं—मी नाहीं फेंकून देणार—मामानं मला दिला आहे तो ! कॉंग्रेसला मतं द्या !

**गोवर्धन :** ( त्याच्यावर हात अुगारीत ) जीव घेओीन तुझा ! बोल ' दाजीसाहेबांना मते द्या—दाजीसाहेबांना मतें द्या—'

**नंदू :** ( रडत रडत ) नाहीं—कॉंग्रेसला मते द्या—कॉंग्रेसला मते द्या !

[ गोवर्धन संतापानें त्याला गालावर मारतो. नंदू किंचाळतो. गिरिजा नंदूला जवळ घेते. अेकच गोंधळ अुडतो. बाहेर पुन्हां पूर्वीच्याच गर्जना.

पडदा पडतो.

# ३

दैनिक ' दुष्काळ ' पत्राची कचेरी. चक्रदेव अस्वस्थपणें अेकटाच फेऱ्या घालीत आहे.

**चक्रदेव :** भोपळे, ही भगवी टोपी आंत ठेवून द्या 'केसरी'च्या फाअिलीवर; ( नोकर येतो. ) आणि आंतल्या कपाटांत वरच्या खणांत 'नव्या काळ'चें फाअिल आहे ना, तिथं गांधी टोपी आहे माझी ती घेअून या !

**नोकर :** म्हणजे काय ?

**चक्रदेव :** सांगितलेलं काम करा ! चौकशा करूं नका !

[ नोकर भगवी टोपी आंत घेअून जातो आणि आंतून अेक गांधी टोपी घेअून येतो. चक्रदेव ती डोक्यावर घालतो नि शेजारीं अेक पांढरी खादीची ' सुभाष ' शालजोडी आहे ती अंगावर घेतो. ]

**चक्रदेव :** आणि हें पहा—भोपळे, तो आंत दाजीसाहबाच्या हॅंडबिलांचा, मत-

पत्रिकांचा आणि जाहिरातींचा मोठा गठ्ठा आहे कीं नाहीं, तो जाळून त्याच्यावर आज सरस तापवून घ्या.

**नोकर** : अुद्यां अिलेक्शन आहे ना ?

**चक्रदेव** : सांगितलेलं काम करा ! चोमडेपणा करूं नका !

[ अितक्यांत भाअी टोळ हातांत ' दुष्काळ ' पत्राचा अुघडा अंक घेऊन घाअीघाअीनें प्रवेश करतो.

**भाअी टोळ** : ( अंक दाखवीत ) काय हो हें ?

**चक्रदेव** : काय झालं ?

**भाअी टोळ** : हें–हें काय छापलंत आज या पत्रावर ! कालपर्यंत सोन्यामारुती पक्षाच्या राजकारणाची निर्भीड चर्चा करणारं दैनिक; आज अेकदम कॉंग्रेसच्या जहाल राजकारणाची सडेतोड चर्चा करणारं दैनिक ! काल रात्रीं धरणीकंप झाला कीं काय तुमच्या छापखान्यांत ?

**चक्रदेव** : ( डोक्यावरील गांधी टोपी दाखवीत शांतपणें ) हें बघा—

**भाअी टोळ** : अरेच्या ! कालपर्यंत डोक्यावर ती भगवी हिंदु टोपी आणि आज-पासून ही सफेत गांधी टोपी ! अेका रात्रींत तिचा रंग अुडाला कीं काय ?

**चक्रदेव** : हें या महाराष्ट्रांतलं नेहमींचं राजकारण आहे ! त्यांत आश्चर्य करण्याचं कारण नाहीं !

**भाअी टोळ** : नाहीं म्हणजे ! मीं आतांपर्यंत पुष्कळ पक्ष बदलले आहेत आणि आतां शेवटीं भाअी झालों आहें; पण तुमचा हा राजकारणांतला ट्रॅन्स्फर सीन बघून आपली अगदीं सपशेल जिरली ! दाजीसाहेबांची अन् तुमची गांठ पडलेली दिसत नाहीं अजून !

**चक्रदेव** : कशावरून ?

**भाअी टोळ** : तुम्ही अद्यापि अिथं जिवंत आहांत म्हणून ! निदान अुद्यांचं हें अिलेक्शन तरी पार पडून द्यायचंत ! बरं, हें पक्षांतर केलं तें केलंत !—पण निदान गप्प तरी बसायचं ! हें–हें काय छापलंत आणखी ! ' दाजीसाहेबांची बायको घराबाहेर पडणार–अन् अेक सुशिक्षित महिला घरांत शिरणार ! ' काय हें ! कोण महिला हो, ही ?

**चक्रदेव** : कोणास ठाअूक प्रमिला का ती ताअी पोळ—

**भाअी टोळ** : हं ! ताअी पोळचं नांव काढूं नका ! तुम्ही दुसऱ्यांची हवी ती बदनामी करा ! पण माझ्या न् ताअीच्या वाटेला जाअूं नका ! बाकी तुम्हांला कारण नसतांना दुसऱ्यांची बदनामी करण्याची वाअीट खोड लागली आहे ! हें–हें–अुद्यांच्या अकांत ' ड्रेनेजचं भयंकर रहस्य ' काय छापणार आहांत ?

**चक्रदेव** : तें आतां सांगितलं तुम्हांला तर माझा अेक अंक अुद्यां कमी खपेल ! मला आतां वेळ नाहीं तुमच्याशीं बोलायला–जा तुम्ही !

**भाअी टोळ** : मी आलों होतों अशासाठीं–ताअी पोळ बसणार म्हणून तुम्हीं खुशाल छापून टाकलंत मागं–अन् आमच्या दोन हजारांचा अजून पत्ता नाहीं ! पैसे पदरांत पडले नाहींत तर आमच्या ताअींचा राजीनामा मिळायचा नाहीं !

**चक्रदेव** : खड्डयांत गेली तुमची ताअी–तिचा राजीनामा–अन् तें अिलेक्शन ! आतां कुणाला त्याची पर्वा आहे ! अुद्यां दुपारीं मी मुंबअीला जाणार आहें आणि तिथून कदाचित् पुढल्या बोटीनं विलायतेला जाअीन म्हणतों—

**भाअी टोळ** : विलायतेला ? तें कशाला ?

**चक्रदेव** : येतों दोनचार महिने चक्कर मारून ! अिलेक्शनची फार दगदग झाली आहे !

**भाअी टोळ** : अन् पैसे ? तुमच्या छापखान्याला तर कर्ज आहे म्हणून बोंब आहे !

**चक्रदेव** : कर्ज फिटलं ! कालच हें मारवाड्याकडून गहाणखत सोडवून आणलं !

**भाअी टोळ** : बरं, पण मग आमचे दोन हजार रुपये कसे मिळणार ?

**चक्रदेव** : जा दाजीसाहेबांकडे ! नाहीं तर करा शंख !

**भाअी टोळ** : पण दाजीसाहेब म्हणतात त्यांनीं पैसे तुमच्याकडेच पोंहोचते केले !

**चक्रदेव** : तर–तर ! डांबीस आहे तो दाजीसाहेब–त्याचं काय अैकतां–कुणी तरी आलं वाटतं–हें पहा अिकडून जा तुम्ही आतां–संध्याकाळीं भेटा—

[ भाअी टोळ शंकित मुद्रेनें जातो. थोडया वेळानें प्रमिला प्रवेश करते.

**चक्रदेव** : या, बसा. माझा निरोप पोंहोचला ना ! —

**प्रमिला** : नाहीं तरी मी येणारच होतें तुमच्याकडे ! माझी निवडणूक बिनविरोध करण्याचं तुम्हीं सर्वांनीं मला वचन दिलंत–ताअी पोळ राजीनामा देणार म्हणून जाहीर केलंत–अन् आतां अुद्यां अिलेक्शन येअून ठेपलं तरी तिच्या राजीनाम्याचा अजून पत्ता नाहीं !

**चक्रदेव :** मीं तुम्हांला बोलावलं होतं तें निराळ्या कामासाठीं.

**प्रमिला :** अिलेक्शनशिवाय मला कांहीं सांगू नका दुसरं ! मग बोला–राजीनामा केव्हां मिळणार ताअी पोळचा ?

**चक्रदेव :** पण तिला दोन हजार रुपये द्यायचे कबूल केले आहेत ते कोण देणार ? दाजीसाहेबांकडून घेऊन या पैसे–म्हणजे आतां आणतों ताअी पोळचा राजीनामा !

**प्रमिला :** दाजीसाहेबांकडून अेक पैहि नको मला ! लोक त्याचा नसताच अर्थ करतील ! परवांपासूनच लोक भलभलतं बडबडायला लागले आहेत !

**चक्रदेव :** आजचीं वर्तमानपत्र वाचलीं नाहींत वाटतं तुम्हीं !

**प्रमिला :** नाहीं. कां ?

**चक्रदेव :** मग ठीक आहे— असं करा तुम्ही— बरं समजा, मींच तुम्हांला हे पैसे दिलेत तर—

**प्रमिला :** ( आनंदानें ) काय म्हणतां ! तुम्हीं देअू शकाल अेवढी रक्कम ? मी निवडून आल्यावर हळूहळू तुमची रक्कम परत करीन !

**चक्रदेव :** तें राहूं द्या हो ! मीं तुम्हांला बोलावणं पाठवलं तें अेवढ्यासाठींच ! मी पैसे देअीन–पण एका अटीवर ! तुमचं अन् प्रमोदचं लग्न जवळ जवळ फिसकटलं असं समजायला हरकत नाहीं ना ?

**प्रमिला :** बरं मग ?

**चक्रदेव :** मग कांहीं नाहीं ! पण त्याबाबत तुम्हीं फिरून विचार केला आहांत काय !

**प्रमिला :** आधीं अिलेक्शन— अन् मग अितर विचार !

**चक्रदेव :** मग मी तुम्हांला आतां स्पष्टच सांगतों—जर तुम्हांला दोन हजार रुपये माझ्यापासून पाहिजे असतील तर या निवडणुकीच्या आधीं— म्हणजे आजच तुम्हांला लग्नाच्या निवडणुकीचा विचार केला पाहिजे ! मी काय म्हणतों तें तुमच्या ध्यानांत आलं असेल.

**प्रमिला :** चांगलंच !– बरं आहे ( अुठते ) नमस्कार !

**चक्रदेव :** थांबा— असं काय करतां ! मी काय म्हणतों तें अैकून घ्या ! अन् नीट विचार करा ! माझ्यांत काय कमी आहे ? अेवढ्या मोठ्या छापखान्याचा मी मालक आहें; माझी सांपत्तिक स्थिति सध्यां तरी अुत्तम आहे. अेका सुप्रसिद्ध दैनिकाचा संपादक आहें मी !

**प्रमिला** : म्हणूनच भीति वाटते ! हें पहा, तुमची माझी ओळख तरी आहे का !

**चक्रदेव** : ओळख नसली तरी करून घेतां येअील ! तुमचं अिलेक्शन झाल्यावर पुढल्या आठवड्यांत मी विलायतेला जाणार आहें—तुम्ही माझ्याबरोबर चला—समुद्रांतल्या प्रवासांत आपला अुत्तम-अगदीं काव्यमय परिचय होअील ! ( तिच्याजवळ लघळपणानें जातो. ) असं काय करतां ! तुम्हीं मला फार आवडतां—

**प्रमिला** : बाजूला व्हा ! तुम्ही मला समजतां काय ?

[ आंतून गोवर्धनाचा रागीट आवाज– ' काय समजतो मला तो ! '

**चक्रदेव** : दाजीसाहेब आले वाटतं. तुम्हीं आंत बसा जरा. मी तुमची समजूत घालीन मागून—मी आतां त्यांची रवानगी करतों !

[ प्रमिला घाअीघाअीनें आंत जाते. गोवर्धन नि पितांबर येतात.

**गोवर्धन** : कुठं आहे तो दुष्काळ्या संपादक ! माझे पैसे खाअून माझी बदनामी करतो !

**पितांबर** : तुम्हीं शांत व्हा ! रागावूं नका !

**चक्रदेव** : मला वेळ नाहीं तुमच्याशीं बोलायला–मला अग्रलेख लिहायचाय् !

**गोवर्धन** : अग्रलेख ! तुझा गृह्यसंस्कारच लिहायला लावतों. हरामखोर ! माझ्या पैशावर वाटेल तसा ताव मारून आज सापासारखा माझ्यावर अुलटलास ?

**चक्रदेव** : (जपून बोला—बेअब्रूची फिर्याद लावीन ! )

**गोवर्धन** : त्याच्या आधी तुला अब्रू आहे हें सिद्ध करायला लागेल. मीच तुला कोर्टांत खेचतो–बोल, हें काय लिहिलंस ? ' दाजीसाहेबांची बायको घराबाहेर पडणार—आणि अेक सुशिक्षित महिला त्यांच्या घरांत शिरणार ! '

**चक्रदेव** : मग त्यांत खोटं काय आहे ?

**गोवर्धन** : खोटं काय आहे ! हरामखोर, तुला काळीज आहे का नाहीं ?

**चक्रदेव** : आरडाओरड काय करतां ? सगळ्या गांवांत बोंब झाली आहे ती तुम्हांला अैकूं येत नाही ? माझ्या नांवानं कां शंख करतां ! खऱ्या बातम्या प्रसिद्ध करणं हे आम्हां वृत्तपत्रकारांचं पवित्र कर्तव्य आहे ! तुमच्या समाधानासाठीं मी माझ्या धंद्याशीं बेअिमान होअूं काय ?)

**गोवर्धन** : कोण सुशिक्षित महिला ही ! माझ्याबरोबर त्या प्रमिलेचीहि बदनामी ! आणि तिच्यासाठीं ताअी पोळला देण्याकरतां दिलेले दोन हजार रुपये कुठं आहेत ! (तूं कोण लुटारू आहेस का डाकू आहेस ?)

**चक्रदेव :** शुद्धीवर आहांत का तुम्ही ? छापखान्याचीं बिलं राहिलीं आहेत पांच हजारांचीं ! तीं कोण देणार ! अुद्यां निवडणूक संपल्यावर परवांच्या दिवशीं तुम्ही दारांत तरी अुभे राहूं द्याल का मला ?

**गोवर्धन :** अन् हें ड्रेनेजचं ' भयंकर रहस्य ' काय छापणार आहेस अुद्यां ?

**चक्रदेव :** रहस्य कसलं ! ड्रेनेजच्या योजनेंत तुम्हीं एक लाख रुपये खाल्लेत ही गोष्ट गांवांत ज्याच्या त्याच्या तोंडीं आहे. हें रहस्य आतां अगदीं सार्वजनिक झालं आहे !

**गोवर्धन :** तूं हें ड्रेनेजचं रहस्य छाप तर खरं ! अुभा ड्रेनेजमध्यें कोंबीन तुला !

**चक्रदेव :** माझं तोंड बंद केलं म्हणून गांवांतल्या हजारों लोकांचीं तोंडं तुम्ही कशीं बंद करणार ! तुमची बायको न् मेहुणा गांवांत ज्याच्या त्याच्याजवळ हेंच सांगत सुटले आहेत—त्यांना आधीं ड्रेनेज दाखवा अन् मग माझ्याकडे या ! गेल्या आठवड्यांत तुमच्याविरुद्ध पत्रांचा अन् लेखांचा डोंगर येअून पडला आहे माझ्या ऑफिसांत ! नागरिकांच्या कल्याणासाठीं सत्य असेल तें अुजेडांत आणणं हें आम्हां वृत्तपत्रकारांचं कर्तव्य आहे !

**पितांबर :** पण मी असं विचारतों चक्रदेव, कालपर्यंत तुम्हीं आमच्या सोन्या-मारुती पक्षाचा पुरस्कार केलांत आणि आज गांधी टोपी घालून तुम्हीं कॉंग्रेसची भाषा बोलूं लागलांत, यांतलं सत्य काय आहे ? तें नाहीं तुम्हीं अुजेडांत आणलंत ?

**चक्रदेव :** ( हंसून ) आतां खरं सांगूं—काल रात्रीं गांधींची मला तार आली !

**गोवर्धन :** काय थापा मारतोस ! गांधींची नाहीं पण गांजाची तार आली असेल तुला ! मी सांगतों पितांबर, हा सापासारखा माझ्यावर आज कां अुलटला तें ! प्रमोदचं अन् प्रमिलेचं बिनसल्यापासून याचा तिच्यावर डोळा आहे. प्रमिला आज माझ्या हातांत आहे या समजुतीनं तिला याच्याशीं लग्न करण्यास भाग पाडावं — नाहीं तर तिला निवडणुकींत मदत करूं नये असा हा अितके दिवस मजजवळ आग्रह धरून बसला होता ! पण मीं, असले धंदे करीत नाहीं म्हणून साफ नाकारलं त्याचा हा सारा सूड आहे !

**पितांबर :** हा डाव होता काय याचा ? म्हणजे सारं कारस्थान रचलं मीं ! प्रमिलेला प्रमोदपासून तोडून तुमच्याकडे आणलं मीं ! आणि मधल्या मधें हा गुलय्या त्या राणीला पळवून नेणार होता होय ?

**चक्रदेव :** तुम्हांला तेवढं फोर्डचं कोरं मॉडेल पाहिजे अन् मग आम्हांला अेखादं नवीन मॉडेल कां नको ? ही निवडणुकीची पर्वणी आहे, काय साधून घ्यायचं

असेल ते याच वेळीं ! पुढं तीन वर्षं कोण कोणाला विचारतो आहे !—भोपळे, फर्मा आणा—

**पितांबर :** कसला फर्मा ?—

**चक्रदेव :** उद्यांच्या अंकाचा ! ( नोकर कच्चा फॉर्म घेऊन येतो. ) आतांच छापायला सुरुवात केली आहे—नाहीं तर पंचवीस हजार प्रती होणार कशा छापून ? सगळं ड्रेनेज-प्रकरण आहे याच्यांत !

**गोवर्धन :** राक्षसा, मांडलं आहेस काय ! त्यापेक्षां माझा खून तरी कर ! काय, पाहिजे तरी काय तुला ?-बोल पांच हजार देतों ! दहा हजार देतों ! पण उद्यांचा दिवस तरी माझा गळा कापूं नकोस !

**चक्रदेव :** म्हणजे, लांच देऊन माझं तोंड बंद होईल असं वाटलं तुम्हांला ? दुसऱ्याचे पैसे खाऊन आम्ही आपलीं वर्तमानपत्रं चालवतों अशी समजूत आहे तुमची ? (वर्तमानपत्रं हें जनतेचं पवित्र न्यायासन आहे ) तें पैसे देऊन भ्रष्ट करतां ? तुमची सारी अिस्टेट आणून जरी माझ्यापुढं ओतलीत तरी सत्याला आणि न्यायाला स्मरून मला माझं निष्ठुर कर्तव्य केलंच पाहिजे ! भोपळे, करा छापायला सुरुवात !

**गोवर्धन :** थांब-थांब-मी पायां पडतों तुझ्या ! जन्मांत कोणाच्या पायां पडलों नाहीं ! माझ्यावर दया कर-अेकच दिवस ! हे तूं छापलंस तर माझा सत्यानाश होईल-माझ्या घरादाराचा-माझ्या सर्वस्वाचा विध्वंस होईल-अेक-अेक मत मिळणार नाहीं उद्यां मला !-सर्वस्वी शरण आहें मी तुला—

**चक्रदेव :** भोपळे, थांबलांत काय—

**गोवर्धन :** ( त्याचे पाय धरतो ) पायां पडलं तर परमेश्वर देखील प्रसन्न होतो रे —

[ गिरिजा व प्रमोद येतात. गिरिजेच्या हातांत छडी आहे.

**गिरिजा :** (परमेश्वर होतो-सैतान नाहीं) ! हा सैतान आहे-याच्या पायां पडतां ! याला जमिनीत गाडल्याशिवाय हा ताळ्यावर येणार नाहीं-अुठा, खेटरानं मारण्याची ज्याची लायकी नाहीं त्याच्या पाया पडतां !

**गोवर्धन :** माझ्या निवडणुकीसाठीं मला वाटेल तें केलं पाहिजे ! तूं कशाला अिथं आलीस आणखी माझा नाश करायला ? चालती हो ! अैन वेळीं माझा

असा अवसानघात करूं नकोस ! मी अुद्यां निवडून आलों नाहीं तर मला आत्महत्त्या करावी लागेल ! जा–जा तू–माझ्या बाळाची शपथ—

**गिरिजा :** बाळाची शपथ ! खबरदार या नरकांत माझ्या बाळाच्या पवित्र नांवाचा अुच्चार केलांत तर ! अुठा–अुठा आधीं– ( गोवर्धन अुठतो. ) चालते व्हा अिथून—

**गोवर्धन :** पण या सैतानानं छापायला सुरुवात केली—

**गिरिजा :** तुमच्याविरुद्ध अेक अक्षर छापलं यानं तर याच्यासकट या छापखान्याला आग लावीन. बाहेर व्हा तुम्ही ! याचा कायमचा बंदोबस्त करून टाकतें मी !

**गोवर्धन :** पहा–नाहीं तर मी बाहेर बसतों ?

**गिरिजा :** ( रागानें ) जा तुम्ही—

[ गोवर्धन आणि पितांबर जातात.

**चक्रदेव :** म्हणजे विचार काय आहे तुमचा ?

**गिरिजा :** ( छडी दाखवून ) हा विचार आहे !

**चक्रदेव :** हा कसला विचार ! हा निव्वळ अविचार ! मी छापत नाहीं अुद्याचा मजकूर ! अुद्यांचा अंक बंद करतों ! मग झ लं !

**गिरिजा :** अुद्यांचं अुद्यां ! आजचं बोल ! काय छापलं आहेस हें ! मी माझ्या नैवऱ्याच्या घरांतून बाहेर पडणार ?—

**चक्रदेव :** साफ खोटं आहे तें ! तुमची माफी मागतों !

**प्रमोद :** आणि दाजीसाहेबांच्या घरांत अेक सुशिक्षित महिला शिरणार ! म्हणजे प्रमिला ?

**चक्रदेव :** तेंहि खोटं आहे–पण प्रमिलेचं तुमचं बिनसलं आहे ना आतां ?

**प्रमोद :** म्हणून तिच्या नांवाची अशी बदनामी मी कधींहि सहन करणार नाहीं.

**चक्रदेव :** माफी मागतों तुमची दोघांची ! अुद्यांच्या अंकांत प्रसिद्ध करतों !

**प्रमोद :** अुद्यांच्या अंकांत !

**चक्रदेव :** नाहीं–नाहीं–अुद्यांचा अंक काढीतच नाहीं ! लिहून देतों पाहिजे तर–

[ जाअूं लागतो.

**गिरिजा** : हलूं नकोस अिथून. मागल्या जन्मीं कोण होतास ? कावळा–गिधाड–लांडगा ! जिवंत माणसाच्या अब्रूचे–काळजाचे–भावनेचे लचके तोडून स्वतःची राक्षसी भूक भागवण्यांत कसला आनंद होतो तुला ?

**चक्रदेव** : अहो–पण मी माफी मागतों ! माफी मागितली तर कोर्टांतले खटले सुद्धां मिटतात !

**गिरिजा** : दुसऱ्याची जाणूनबुजून बदनामी करायची आणि मागून बेशरमपणानं माफी मागायची हा तुझा नेहमींचा धंदा झालेला आहे ! पश्चात्तापासारख्या पवित्र भावनेची तूं थट्टा मांडली आहेस ! संपादकाची लेखणी म्हणजे कसायाची सुरी आहे ? कां या पवित्र धंद्याची विटंबना चालविली आहेस ! आपल्या आया-बहिणींच्या नांवांचीं अशी खोडसाळ बदनामी करणाऱ्या माणसाला कायमची अद्दल बसावयाची म्हणजे अशीच झणझणीत शिक्षा बसायला पाहिजे !

[ त्याच्या अंगावर दोन छड्या ओढते.

**चक्रदेव** : मेलों–पायां पडतों तुमच्या. मारा, पण तें बाहेरचं दार तरी बंद करा–

**गिरिजा** : फिरून छापशील असा मजकूर ?

**चक्रदेव** : फिरूनचा प्रश्नच नाहीं ! बंदच करतों वर्तमानपत्र ! मारूं नका—

**गिरिजा** : चल प्रमोद —

**चक्रदेव** : मारलंत त्याचं कांहीं नाही; पण बाहेर जाअून हें कोणाला सांगूं तरी नका !

[ गिरजा आणि प्रमोद कांही न बोलतां जातात. चक्रदेव अंग साफसूफ करून आंतल्या दाराकडे वळतो, तोंच प्रमिला दुसरी छडी घेऊन आंतून प्रवेश करते.

**चक्रदेव** : माझे आअी, मेलों आतां—

# [ २ ]

[ रस्ता. घरमालक देव, बलदेव, भोपळे, ढेकणे आणि अितर कांहीं मंडळी बोलत बोलत प्रवेश करतात.

**भीमाशंकर** : कॉंग्रेसला मतं देअूं नका असं जे आम्हीं तुम्हांला ओरडून सांगतों आहोंत तें काय अुगाच ! आज राष्ट्रांत अेक प्रकारचा संभ्रम अुत्पन्न झालेला

आहे. कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत राहिलेला नाहीं—कुटुंबसंस्था नाश पावण्याची वेळ आलेली आहे—संततिनियमनासारखीं खुळं समाजांत आज बोकाळलीं आहेत !

**मालक :** अगदीं बरोबर— लाख बोललांत ! संततिनियमन फार वाअीट !

**भीमाशंकर :**आमच्या पूर्वजांनीं संततिनियमन केलं असतं तर राम, कृष्ण, भीष्म, शिवाजी असे वीर समाजांत निर्माण झाले असते काय ?

**बलदेव :** मग म्हणणं काय तुमचं ?

**भीमाशंकर :** म्हणणं हेंच, कीं अुद्यांच्या म्युनिसिपालिटीच्या निवडणुकींत तुम्हीं कॉंग्रेसला मतं देअूं नका !

**बलदेव :** काय भरमसाट थाप मारून लोकांच्या डोळ्यांत धूळ टाकतां आहांत तुम्ही ! कॉंग्रेसचा अन् संततिनियमनाचा संबंध काय ? काय वाटेल तें सांगतां काय ? तुमच्या या गप्पा अैकून अेवढं मात्र पटलं, कीं तुमच्या तीर्थरूपांनीं संततिनियमन केलं असतं तर या गांवावर फार अुपकार झाले असते !

**भीमाशंकर :** यांचं अैकूं नका तुम्ही ! मी तुम्हांला सांगतों, कॉंग्रेसनं आपल्या देशाचं-धर्माचं-आपल्या समाजाचं-कुटुंबाचं अन् नीतीचं वाटोळं करून टाकलं आहे.

**मालक :** टाळी द्या ! आम्ही तरी काय हेच सांगतों आहोंत !

**बलदेव :** कॉंग्रेसनं देशाचं वाटोळं केलं आहे काय ? महात्मा गांधी—जवाहरलाल नेहरू—सुभाषबाबू अशा मोठमोठ्या लोकांनीं कॉंग्रेसमधें जाअून देशाचं वाटोळं केलं आहे अन् तुम्ही सोन्यामारुती पक्षाचे टिकोजी आतां म्युनिसिपालिटींत शिरून देशाचं चपटं करणार आहांत होय !

**भोपळे :** पण मी म्हणतों भांडायचं कारण काय ? बोलून चालून म्युनिसिपालिटीचं अिलेक्शन ! तें अुद्यां संध्याकाळीं संपलं म्हणजे परवां आपण विसरून देखील जाअूं ! त्याच्यासाठीं अेवढी राजकारणाची माथेफोड कशाला ?

**भीमाशंकर :** तुम्हांला अक्कल नाहीं ! बोलूं नका ! मी वाटेल त्याला पटवून देअीन मी काय म्हणतों तें ! (कॉंग्रेसनं आमचा धर्म बुडवला आहे !)

**मालक :** भले ! कसं बोलतात—

**भीमाशंकर :** यांना नाहीं म्हणूं द्या ! आमच्या सार्वजनिक देवळांतून, हॉटेलमधून, विहिरींवर सर्रास जाण्याची परवानगी या अस्पृश्यांना देअून कॉंग्रेसनं

आमच्या धर्माचं वाटोळं केलं नाही तर काय केलं ? अुद्यां हे महारडे धडाधड आमच्या अंगाला धक्के देअून देवळांत शिरतील ! सार्वजनिक हौदांत घेडं आपलीं मडकीं बुडवतील; अन् हॉटेलांत आमच्या मांडीला मांडी लावून भंगी लोक भजीं खातील !

**मालक** : हरे राम राम ! हिंदु हॉटेलांत जाण्याची सोयच नाहीं आतां ! आपलं अिराण्याच्या हॉटेलांत गेलेलं फार बरं !

**बलदेव** : देवळं–विहिरी–हॉटेलं तुमच्यासाठीं राखून ठेवलीं म्हणजे धर्माचं रक्षण होतं ? धर्म म्हणजे स्पृश्य लोकांच्या बापजाद्यांनीं त्यांच्यासाठीं मोकाट चरायला राखून ठेवललं कुरण आहे होय !

**भीमाशंकर** : आज महार देवळांत शिरले–अुद्यां ते आमच्या स्वयंपाकघरांत शिरतील अन् त्यांच्या मागोमाग मुसलमान घुसले म्हणजे मग ?

**मालक** : काय बोललांत ! हेंच आम्ही म्हणतों—

**भीमाशंकर** : आज नाहीं उद्यां हें व्हायचंच ! कॉंग्रेस आज मुसलमानांची मोलकरीण झाली आहे ! मुसलमान असे शेफारून गेले आहेत–अुद्यां तुमच्या आमच्या पोरीबाळांना घरांतून बाहेर पडणं अशक्य होअील ! काय चेष्टा आहेत !

**मालक** : अगदीं लाख बोललांत ? अुद्यां कशाला ! या–या म्युनिसिपालिटीच्या याद्याच बघा ! आमच्या तीर्थरूपांना खुशाल महादेवाचं महमंद करून टाकलं आहे यांनीं !

**बलदेव** : का मुसलमानांची बदनामी करतां ! सारे मुसलमान तेवढे मवाली अन् हिंदु तेवढे साधुसंतांचे अवतार होय ! तुम्ही म्हणतां कॉंग्रेस मुसलमानांची बटीक झाली–पण मुसलमान म्हणतात कॉंग्रेस ही हिंदूंच्या हातांतली बाहुली आहे खरं कोणतं !

**भीमाशंकर** : चूक–घरच्या म्हातारीची काळ आहे कॉंग्रेस ! आहिंसेचं गुजराती खूळ आमच्या देशांत पिकवून कॉंग्रेसनं आमचा पराक्रम, आमचं पौरुष, खच्ची करून टाकलं आहे ! आमचीं शस्त्रं हिरावून घेअून इंग्रजांनीं आम्हांला भ्याड बनवलं— अन् कॉंग्रेस आतां आहिंसेचे डोस पाजून आम्हांला नादान बनवते आहे ! जा— शेळीचं दूध प्या— नाहीं तर नीरा प्या शेगांवला जाअून म्हणजे स्वराज्य मिळेल !

**बलदेव** : आमचं पौरुष खच्ची झालं आहे— पण तुमचं पौरुष तर शाबूत आहे

ना चांगलं ? मग अिथं गांवटाणांत बसून कां भुंकतां आहांत ? जा दिल्लीला अन् तख्त फोडा सदाशिवरावभाअूसारखं—नाहीं तर राघोबादादासारखे अटकेपार जाअून झेंडे लावा ! म्युनिसिपालिटीच्या कचऱ्यांत कशाला डोकं खुपसतां आहांत ! सोजीर पाहिला तर धोतराचा पितांबर होअील तुमच्या ! पराक्रमाच्या गप्पा कशाला मारतां आहांत !

**मालक :** हे लाख बोललांत— हें अगदीं पटलं !

**भीमाशंकर :** पराक्रम पूर्वीहि आम्हींच केला आहे— आणि पुढंहि कोणी करणार असेल तर आम्हीच करूं, समजलांत ! कांहीं झालं तरी हिंदु लोकांचं संरक्षण या कॉंग्रेसवाल्यांच्या हातून होणं शक्य नाहीं ! म्हणून म्हणतों, तुम्हांला आपला धर्म राखायचा आहे ना ?

**भोपळे :** }
**ढेकणे :** } म्हणजे, काय प्रश्न आहे काय ?

**भीमाशंकर :** तुम्हांला आपल्या शेंड्या शाबूत ठेवायच्या आहेत ना ? मग अयांच्या निवडणुकींत तुम्ही सोन्यामारुती पक्षाच्याच अुमेदवाराला आपली मतं द्या. हा पाहिलांत आमचा जाहीरनामा !

**मालक :** हें —हें छान केलंत ! म्हणजे जाहीरनामा पाहिजेच होता.

**भीमाशंकर :** कॉंग्रेसचे लोक रस्ते डांबराचे अन् कॉंक्रीटचे करणार म्हणून घोषणा करतात ! हें यांचं स्वधर्म प्रेम ! तुम्हीच सांगा, सोवळं नेसून डांबराच्या रस्त्यावरून आपण हिंदुलोक जाणं कधीं शक्य आहे का ? हें आमचं वाचा. (जाहीरनामा वाचतो.) आम्ही शहरांतील साऱ्या सडका गाअीच्या शेणाच्या करणार !

**बलदेव :** छान ! म्हणजे पावसाळ्यांत साऱ्या गांवाचा चांगला गोटा होअील !

**भीमाशंकर :** रस्त्यानं जागोजाग आम्ही गोमूत्राचे आणि पंचगव्याचे हौद बांधणार ! वाटेंत महार–मांगांचा विटाळ झाला तर आपलं तिथल्या तिथं शुद्ध होतां यावं ! स्नानसंध्या करायला नदीच्या दोन्ही बाजूंनीं प्रशस्त घाट बांधणार अन् शहरांत जिथं जिथं मोकळ्या जागा आहेत तिथं दुर्वा नि तुळशी लावणार ? गांवांत जानवी, मुकटे, पितांबर, धाबळ्या, हरणाचीं कांतडीं यांच्यावरची जकात माफ करणार, अन् जातिभेद न मानणाऱ्या अिराण्याच्या हॉटेलांत जाणाऱ्या सहभोजनी सुधारकांवर आम्ही जबर कर बसविणार !

**मालक :** हें–हें अगदीं करायलाच पाहिजे—या सुधारकांनीं अगदीं ताळच सोडला आहे !

**भीमाशंकर :** नागरिकांच्या शेंड्या न् जानवीं तपासण्यासाठीं आम्ही अेक स्पेशल अिन्स्पेक्टर नेमणार! दर वर्षी म्युनिसिपालिटीच्या खर्चानं गांवांतून सार्वजनिक श्रावण्या करवणार—अेवढंच नव्हे तर अलीकडे या मूर्ख सुधारकांनीं आमचा आर्यांचा जो पवित्र सण शिमगा तो बंद करून टाकला आहे, त्या शिमग्याचा आम्ही म्युनिसिपालिटीच्या खर्चानं जीर्णोद्धार करणार !

**बलदेव :** तुमच्याच हस्तें अुद्‌घाटनसमारंभ होअूं द्या !

**भीमाशंकर :** गांवांत रस्ते डांबराचे झाल्यापासून अन् ही ड्रेनेजची योजना सुरू झाल्यापासून महार न् भंगी फार शेफारले आहेत ! कारण त्यांना कामच कांहीं अुरलं नाहीं ! खुशाल नाक वर करून रस्त्यांवरून हिंडतात बेशरम ! तेव्हां आम्ही ड्रेनेज बंद करणार आणि पूर्वींचेच शौचकूप सुरू करून वर्णाश्रमव्यवस्थेप्रमाणं या भंगी लोकांच्या डोक्यावर पाट्या चढवणार !—मग बोला—आतां कुणाला तुम्ही आपलीं मतं देणार !

**बलदेव :** कुणाला म्हणजे— अेवढं सारं अैकल्यावर तुम्हांला मतं देण्याअितके हे लोक मूर्ख नाहीत !

**मालक :** छे, छे ! प्रश्नच नाहीं मुळीं ! आमचीं सारीं मतं आम्ही बेधडक कॉंग्रेसलाच देणार.

**सारे :** बरोबर कॉंग्रेसलाच देणार !

**भीमाशंकर :** काय हरामखोर आहांत तुम्ही लोक ! अितका वेळ तुमच्यापुढं घसा फोडला त्याचं हें बक्षीस होय ! जा – द्या – कॉंग्रेसला मतं द्या – हिंदु धर्माचं वाटोळं करा– अन् नरकांत जा ! ( बलदेवला ) तुझी बदमापगिरी आहे ही सारी–परवां दाजीसाहेबांकडून पैसे अुपटलेस देवळासाठीं अन् तालमीसाठीं–अन् आतां कॉंग्रेसला मतं द्या होय !

**बलदेव :** अन् तुम्हीं तो शंकराचार्यांच्या नांवावर चेक अुपटला दीड हजाराचा ती भानगड सांगूं का यांना ?

**भीमाशंकर :** बोलूं नकोस– कधीं कल्याण होणार नाहीं तुझं ! वाटोळं होअील वाटोळं !

[ रागानें निघून जातो.

**बलदेव :** बोला, कॉंग्रेस की जय !

[ सारे तसे ओरडतात. अितक्यांत प्रमोद प्रवेश करतो.

**प्रमोद** : शाबास ! अशी तुमची निष्ठा असल्यावर अुद्यांची निवडणूक कॉंग्रेस जिंकणार यांत शंकाच नाहीं !

**बलदेव** : हे सारे आपल्या कॉंग्रेसलाच मतं देणारे लोक आहेत !

**मालक** : भले, हें कुणी तुम्हांला सांगितलं ! तुमच्यापुरतं तुम्ही बोला !

**बलदेव** : म्हणजे काय ! अहो, आतां ' कॉंग्रेस की जय ' ओरडलांत ना !

**मालक** : हो ! मग त्यांत काय आहे ! तुम्ही ओरडलांत म्हणून आम्ही ओरडलों !

**भोपळे** : तुम्ही ' सोन्यामारुती की जय ' ओरडलां असतां तर आम्ही तसं ओरडलों असतों !

**ढेकणे** : नुसत्या आरडाओरडीवर काय आहे ?

**बलदेव** : मग, पक्ष तरी कोणता तुमचा ! सोन्यामारुती का कॉंग्रेस ?

**मालक** तें कांहीं सांगतां येत नाहीं ! जिथून पैसा मिळेल तो आमचा पक्ष ! हें पहा, आतां तुम्हांला अुघड विचारतों–अुगाच चर्चा नको ! ( प्रमोदला ) तुम्ही अुभे आहांत ना ? मग दाजीसाहेबांचा दहाचा भाव सुटला आहे —

**भोपळे** : आतां तुमचा भाव बोला ?

**प्रमोद** : कॉंग्रेसचे अुमेदवार प्राण गेला तरी मतासाठीं पैसे देणार नाहींत !

**मालक** : मग मरा जा !—चला रे !

**बलदेव** : हें पहा, असं काय करतां ! अिकडं या. मी सांगतों तें ऐका ! तुम्हांला पैसेच पाहिजेत ना ! मग दाजीसाहेबांकडून तुम्ही खुशाल पैसे घ्या–आम्ही नाहीं कुठं म्हणतों ? पण मतं यांना द्या म्हणजे झालं !

**मालक** : भले ! काय बोललांत ! मग असंच करा ना – तुम्हीच पैसे द्या— अन् मतं दाजीसाहेबांना देअून टाकतों म्हणजे झालं ! आम्हांला बनवतां होय ! अहो, अशीं छप्पन अिलेक्शनं खेळलो आहोंत आम्ही ! कित्येक वेळेला दोन्ही बाजूचे पैसे खाऊन आम्ही कुणालाच मतं देत नसतों ! बरं आहे, नमस्कार !

**बलदेव** : अहो, पण मग अुद्यांचं काय ?

**मालक** : हातांत दमड्या नाहींत अन् अुद्यांच्या गोष्टी कशाला करतां आहांत ? निवडणुकी लढवणं तुमचीं कामं नव्हत ! अुद्यांचं अुद्यां ! आज अुधार पण– अुद्यां रोख !

**सारे** : बरोबर—आज अुधार अुद्यां रोख !

[ जातात.

**प्रमोद** : मतदारांचे हे असले अिरसाल नमुने पाहिले म्हणजे देशाच्या भविष्यविषयीं अंतःकरण साशंक होतं — अन् मन अुद्विग्न होतं !

प्रभु, द्यावा हा वर भारता,
 न्या कुटिलपणा विलया आतां !
नच शिवो मना धनवासना,
 जनपदीं जडो मनकामना !
मनिं वसो सदा सुखशांतता !

**बलदेव** : तुम्ही काळजी करूं नका ! मजजवळ तीनशें मतं आहेत ! तीं सारींच्या सारीं तुम्हांलाच मिळणार !

**प्रमोद** : काय म्हणतां ! देवच भेटलांत तुम्ही मला ! काय नांव तुमचं ?

**बलदेव** : अुद्यां सांगेन तुम्हांला ! तुम्ही आतां थांबूं नका— कामाला लागा— अन् धीर सोडूं नका ! पुढें काय होअील याचा विचार करीत बसलांत तर अिलेक्शन लढवणं अशक्य आहे ! काय करायचं ते मी सारं करतों आहें ! कांहीं झालं तरी अुद्यां कॉंग्रेसला यश मिळालंच पाहिजे.

[ जातो. प्रमोद त्याच्याकडे पाहात अुभा राहतो. मागून प्रमिला येते.

**प्रमिला** : प्रमोद !

**प्रमोद** : कोण तूं ?— मीं ओळखलं नाहीं तुला !

**प्रमिला** : मी पायां पडतें तुझ्या— मला क्षमा कर—

**प्रमोद** : मी कांही तुझा मतदार नाहीं. माझ्या कां पायां पडतेस ?

**प्रमिला** : मी निवडणुकीला अुभी राहत नाहीं. अुद्यां मीं माझं नांव मागं घ्यायचं ठरवलं आहे !

**प्रमोद** : अरेच्या ! आमचा अुमेदवार अितक्यांतच ढासळला ! छे, हें काय भलतंच !

**प्रमिला** : अुन्मादाच्या भरात मी वाटेल तें बोललें तुला, माझ्या प्रेमाला मीं पायदळीं तुडवलं, त्याचा अुपमर्द केला !

**प्रमोद** : निवडणुकीची नशा अितक्यांत अुतरली तुझी ! जा— दाजीसाहेबांकडे जा ! त्यांची मदत असल्यावर तुला माझी काय पर्वा ? जा, नांव मागं घेऊं नकोस ! म्युनिसिपालिटीपुढं प्रेमाची काय पर्वा ? मी नीच— हलकट मनुष्य— माझीं प्रेमपत्रं वाचलीं आहेस ना सारीं– तुरुंगवारंट निघणार आहे ना मला—

**प्रमिला** : मेलेल्याला आणखीं कां मारतोस ! तें सारं खोटं आहे ! माझी मनोमन खात्री पटली ! तुला सर्वस्वीं शरण आहें मी ! मला क्षमा कर !

हांसुनिया सदया बोला ना,
प्रेमळ राया, पातळ माया
काय गडे करितां वाया !
शोभत वदना कोप न असला,
मोहकतेला डाग कशाला !
घ्या आतां नाथा करिं काया !

**प्रमोद** : क्षमा ! काय म्हणून क्षमा कर ! तुझ्या तऱ्हेवाअीक मूर्खपणाला क्षमा करण्याअितकं माझं औदार्य कांहीं लवचिक नाहीं ! [निवडणूक ही मनुष्याच्या स्वभावाची, त्याच्या माणुसकीची, त्याच्या निष्ठेची अुत्तम कसोटी आहे,] हें मात्र मला चागलं कळून चुकलं ! केवळ मला विरोध केला असतास तर मला त्याचं कांहीं वाअीट वाटलं नसतं ! पण तुझ्या मूर्ख महत्त्वाकांक्षेची मजल माझ्या कॉंग्रेसला विरोध करून सोन्यामारुती पक्षाला मिळण्यापर्यंत गेली याबद्दल मीं तुला क्षमा करणे कधींच शक्य नाहीं !

**प्रमिला** : अंतःकरणापासून पश्चात्ताप झाला तरी तुम्ही मला क्षमा करणार नाहीं ?

**प्रमोद** : फक्त अेका अटीवर ! अुद्यांच्या निवडणुकींत कॉंग्रेसतर्फे अुभ्या राहिलेल्या हरिजन अुमेदवाराच्या पोलवर सबंध दिवसभर अुभं राहून त्याच्यासाठीं अविश्रांत खटपट करशील—

**प्रमिला** : कबूल !

**प्रमिला :** आणि अेक वर्षभर कोठल्या तरी खेडेगांवांत जाऊन कॉंग्रेसचं ग्रामोद्धाराचं कार्य यशस्वी तऱ्हेनं करशील—

**प्रमिला :** कबूल !

**प्रमोद :** तर मी तुला क्षमा करीन ! जातों मी–मात्र तुझा राजीनामा आतांचे आतां योग्य अधिकाऱ्याकडे पाठवून दे.

[ जातो.

**प्रमिला :** हा माझा राजीनामा लिहून तयार आहे !

[ बॅगमधून कागद काढते. भाअी टोळ, ताअी पोळ येतात.

**भाअी टोळ :** आणि यांचा राजीनामा आज आठ दिवस लिहून तयार आहे. पण आमच्या दोन हजारांचा कोणी थांगच लागूं देत नाहीं !

**प्रमिला :** कसले दोन हजार ?

**भाअी टोळ :** भले शाबास ! म्हणजे तुमची निवडणूक बिनविरोध करण्यासाठींच या ताअी पोळनीं आपलं नांव मागं घ्यावं म्हणून आम्हांला दोन हजार रुपये देण्याचं त्या दिवशीं तुमच्यादेखत दाजीसाहेबांनीं अन् पितांबर वकिलांनीं कबूल केलं आहे ! प्रत्येकाच्या घरीं रोज खेटे घालून पायाचे तुकडे पडले माझ्या ! अुद्यां अिलेक्शन अन् अजून पैशाचा पत्ता नाहीं ! मी साफ सांगतों तुम्हांला ! आज संध्याकाळच्या आंत माझ्या हातांत—

**ताअी पोळ :** नाहीं–माझ्या हातांत—

**भाअी टोळ :** बरं, हिच्या हातांत—दोन हजार पडले नाहींत तर अुद्यांची निवडणूक आम्ही बेशक लढवूं अन् हा राजीनामा फाडून टाकूं !

**प्रमिला :** मग आतांच फाडून टाका तो ! आग लागे ना त्या निवडणुकीला !

**भाअी टोळ :** म्हणजे काय !

**प्रमिला :** मी माझ्या अुमेदवारीचा राजीनामा देणार आहें आतां ! हा काय. लिहून तयार आहे ! तेव्हां या अुद्यां बिनविरोध निवडून आल्या म्हणून समजा

[ जाते.

**ताअी पोळ :** काय म्हणतां—मी निवडून आलें ! बिनविरोध निवडून आलें मी म्युनिसिपालटीची मेंबर झालें ! खरंच म्युनिसिपालिटीची मेंबर झालें ! म्हणजे आपला आजच निकाल लागला !

**भाअी टोळ :** ( खालीं बसतो. ) हो, चांगलाच निकाल लागला ! ( ताअी पोळ एकदम रडूं लागते. ) अरेच्या ! रडायला काय झालं तुला !

**ताअी पोळ :** ( रडत ) मी निवडून आलें आज; पण अजून स्वराज्य मिळालं नाहीं ! कधीं मिळणार स्वराज्य !

**भाअी टोळ :** म्युनिसिपालिटींत जा—अन् रड मोठ्यानं—म्हणजे स्वराज्य मिळेल !

**ताअी पोळ :** रडेन रडेन जा मी ! मी निवडून आलें म्हणून तुम्ही माझ्याबद्दल हंसा—हंसा ना ! ( भाअी टोळ भयाण हंसतो ) काय हो हें असं !

**भाअी टोळ :** तूं रड तिकडे, म्हणजे मला चांगलं हंसूं येअील ! तें कांहीं नाहीं. तूं म्युनिसिपालिटींत जाणार तर आपणहि म्युनिसिपालिटींत जाणार !

**ताअी पोळ :** तें कशाला ?

**भाअी टोळ :** पास काढायला माझा !

**ताअी पोळ :** भलतंच काय ! चांगली बिनविरोध निवडून आलें मी.

[ डोळे पुसते.

**भाअी टोळ :** अन् अिकडे दोन हजार रुपये फटकन् बुडाले ते ! केवढा धक्का बसला मला !

**ताअी पोळ :** मग म्युनिसिपालिटींत गेल्यावर काढीन कीं सारा वचपा ! दोन हजार काय— चांगले पांच हजार रुपये आणीन !

**भाअी टोळ :** तूं म्युनिसिपालिटींत जाअून पैसे आणणार ! तोंड बघा तुझं ! म्युनिसिपालिटींत जाअून पैसे खाणारीं माणसं निराळीं असतात. मी चेहरा पाहून कुंडली मांडतों पैसे खाणाऱ्या मेंबराची ! पैसे कांहीं नाहीं पण नखं खात बसशील तूं तिथं ! सगळा डाव फसला माझा ! या निवडणुकींत निदान एखादी पंचकडी तरी मिळेल अशी माझी कल्पना होती ! निम्मी तूट येणार आतां !

**ताअी पोळ :** आतां पुरे करा हा तुमचा अुडाणटप्पूपणा ! जेवढं मिळालं तेवढं पुरें झालं—आतां सोडून द्या हे सगळे धंदे ! खटारेवाले—टांगेवाले—सलूनवाले यांचे संघ काय काढतां, अन् संप काय करतां, न् तीं शनवारवाड्यापुढचीं व्याख्यानं काय किंचाळतां ! वीट आला मला तुमच्या या भाअीगिरीचा ! तुमच्याबरोबर माझ्या आयुष्याची मात्र परवड झाली आहे.

**भाअी टोळ :** तर–तर ! भाअीगिरी सोडून द्या म्हणे ! तुला काय अक्कल आहे ! भाअीगिरी ही पूर्वीच्या दादागिरीची आधुनिक आवृत्ति आहे, समजलीस ! बेफाट बोलायचं–अफाट ओरडायचं नि मोकाट फिरायचं म्हणजे भाअीगिरी ! ही सोडून देअून करूं काय मी !

**ताअी पोळ :** चांगली म्युनिसिपालिटींत नोकरी पत्करा–मेंबर झालें आहें मी !

**भाअी टोळ :** कसली नोकरी पतकरूं मी म्युनिसिपालिटींत ! टोलनाक्यावरील जकातवाल्याची—का मृत्यूचे पास फाडीत बसणाऱ्या त्या भयंकर कारकुनाची –का अुंदरांचे पिंजरे घरोघर पोंहोचविणाऱ्या मुकादमाची ! म्हणजे तूं बसणार वर म्युनिसिपालिटीच्या सभेंत अैटींत सभासदांशीं कानगोष्टी करीत; अन् मी खाकी डगला अंगावर चढवून खालीं झाडूवाल्यांशीं गप्पा मारीत बसूं होय ! शाबास !

**ताअी पोळ :** मग खुशाल हिंडा गांवांत अुकिरडे फुंकीत ! मी आपली म्युनिसिपालिटींत जाणार !

**भाअी टोळ :** तर–तर–कशी म्युनिसिपालिटींत जातेस तूं पाहतों मी !

**ताअी पोळ :** मग काय तुमच्याबरोबर हिंडूं काय मुरळीसारखी ! म्युनिसिपालिटींत जाअूं नको म्हणतां तर माझ्याशीं लग्न तरी करा !

**भाअी टोळ :** लग्न ! छट् ! लग्नसंस्थेवर विश्वास नाहीं आमचा ! बायकांवर विश्वास आहे, पण लग्नावर–नांव काढूं नकोस ! प्रेम, विवाह, लग्न या साऱ्या वर्गीय कल्पना असून गरीबांना फसविण्यासाठीं भांडवलवाल्यांनीं निर्माण केलेलीं हीं खुळं आहेत !

**ताअी पोळ :** लग्न करायचं नाहीं ! अहो, तुळशीचीं देखील लग्नं होतात–परवांच झालं आणि माणसांनीं लग्नं करायचीं नाहींत तर मग संसार चालणार कसा ?

**भाअी टोळ :** लग्नाचा न् संसाराचा काय संबंध ! जीवनाचा प्राणिशास्त्राच्या दृष्टीनं विचार कर–गाअी, म्हशी, कुत्रीं, मांजरं यांचीं होतात लग्नं ? निसर्गांत मूर्ख मनुष्यप्राण्याशिवाय कोणत्या प्राण्याचं लग्न होतं–सांग ? मग त्यामुळं सृष्टीचा संसार काय अडून बसला आहे ?

**ताअी पोळ :** मग असं करा ! तुम्ही यापुढं प्राणिशास्त्राच्याच दृष्टीनं आयुष्याचा विचार करा ! घर सोडून गोठ्यांत राहायला जा, अन्नाअैवजीं वैरण खा, रवंथ

करा आणि दसरा–दिवाळी अैवजीं पोळा साजरा करा ! तुम्ही नका करूं लग्न– मी आतां मेंबर झालें–मला माझ्या लग्नाचं जमवलंच पाहिजे कुठं तरी !

**भाअी टोळ :** आतां तूं नगरमाता झाली आहेस नगरमाता ! तुझ्याशीं कोण लग्न करणार ! जो तुझ्याकडे येअील त्याला आतां 'वंदे मातरम्' च म्हणायला लागेल !

**ताअी पोळ :** पुरे पुरे, म्युनिसिपालिटींत चांगले पन्नास–साठ सभासद आहेत म्हणतात ! त्यांतला अेक देखील तयार व्हायचा नाहीं काय !

**भाअी टोळ :** अरेच्या हें नाहीं माझ्या ध्यानांत आलं ! आतां अगदीं सपशेल कबूल ! म्युनिसिपालिटीचे हे नगरपिते काय वाटेल तें करायला तयार होतील ! त्यापेक्षां आपणच या लग्नाला तयार झालेलं काय वाअीट ?

**ताअी पोळ :** मग–चला आतांच्या आतां कुठं तरी जाअून लग्न लावूं !

**भाअी टोळ :** आज नाहीं ! अुद्यां —

**ताअी पोळ :** अहो, अुद्यां तर अिलेक्शन ! अुद्यां कसा वेळ मिळणार ?

**भाअी टोळ :** मूर्ख आहेस, अुद्यांच वेळ मिळणार ! सकाळीं साडेसहा वाजतां मतदार आणण्यासाठीं दाजीसाहेबांची मोटार घेअून आपण दोघांनीं जें बाहेर पडायचं ते थेट बनेश्वर गांठायचं !

**ताअी पोळ :** अन् परत केव्हां यायचं ?

**भाअी टोळ :** संध्याकाळीं अिलेक्शन संपायच्या वेळीं ! म्हणजे दुपारभर हनिमून ! दाजीसाहेबांच्या खर्चानं !

**ताअी पोळ :** अन् दाजीसाहेबांना कळलं म्हणजे !

**भाअी टोळ :** तें शक्य नाहीं ! मतदार गोळा करायला फिरत होतों यासारखी सबब नाहीं दुसरी ! प्रत्येक निवडणुकींत आम्ही हेच धंदे केले आहेत ना ! सकाळीं मोटर घ्यायची, आंत स्वयंसेविका बसवायच्या न् मतदार आणायला जें जायचं गांवाबाहेर ते थेट दिवसभर अेखाद्या आंबराअींत, नाहीं तर पडक्या देवळांत !

**ताअी पोळ :** मग खरंच तुम्ही करणार माझ्याशीं लग्न–अुद्यां ?

**भाअी टोळ :** खरंच म्हणजे ! हें वचन घे ! याच्यावर विश्वास आहे ना तुझा ! लग्नाचं वचन आहे हें ! मत देण्याचं नाहीं. ( ताअी पोळ रडूं लागते. ) अरेच्या ! फिरून रडायला लागलीस !

**ताअी पोळ :** अुद्यां माझं लग्न होअील ! अन् अजून स्वराज्याचा पत्ता नाहीं !
**भाअी टोळ :** लग्न झाल्यावर स्वराज्य काय असतं तें दिसेल बरं ! पूस डोळे अन् जन्मांतून–अेकदां तरी हास ! अजून म्युनिसिपालिटींत जायला अवकाश आहे तुला !

गेंद चल फुलूं दे हा हसरा !
तुझा बघुं दे जरा नखरा !
चेहरा तुझा हा गोरा,
शेपटा तुझा हा प्यारा,
करि असा जिव्हारीं मारा !
काशि चम्‌चम् करि नभिं तारा !
घे, आतां हा मुजरा !

## [ ३ ]

हा प्रवेश दृश्य नसून श्राव्य आहे. या वेळीं पडद्यांतून निवडणुकीच्या दंगलीच्या पुढीलप्रमाणें घोषणा, जयजयकार नि आवाज अैकूं येत आहेत.

"सोन्यामारुती की जय !— हिंदु धर्म की जय !—कॉंग्रेस की जय ! महात्मा गांधी की जय ! कॉंग्रेसला मतें द्या !–कॉंग्रेसचा धिक्कार असो ! नागोबापुढें फुली करा ! दहाचा आंकडा विसरूं नका ! सोन्यामारुतीला मतें देअूं नका ! हिंदी स्वातंत्र्याचा विजय असो ! चरख्यापुढें फुली करा ! महात्मा गांधी की जय ! जवाहरलाल नेहरू की जय ! भारतमाता की जय !"

यानंतर मधल्या सुट्टीची घंटा वाजते.

## [ ४ ]

गोवर्धनाचा दिवाणखाना. थोड्या वेळानें गोवर्धन पुढें आणि भीमाशंकर मागें असे प्रवेश करतात. गोवर्धन रुमाल अन् काठी रागारागानें कोचावर फेंकून देतात.

**गोवर्धन :** मेलों ! ठार झालों ! बारा वाजायच्या आंत बारा वाजले !

**भीमाशंकर :** तुमच्यासारख्यांनीं धीर सोडल्यावर आम्हीं काय करायचं ?

**गोवर्धन :** पुरता—पुरता निकाल लागला ! सारे निकमहराम—विश्वासघातकी—कृतघ्न—गळेकापू—दरवडेखोर आहेत ! साऱ्यांनीं मला फसवलं—बायकोनं—मुलानं— नातेवाअिकांनीं— मित्रांनीं— भाडेकऱ्यांनीं— तुम्ही देखील— चला, चालते व्हा येथून ! तोंड दाखवूं नका तुम्ही !

**भीमाशंकर :** शांत व्हा–शांत व्हा—

**गोवर्धन :** तुम्हीं–तुम्हीं लोकांनीं माझे पैसे खाअून माझा गळा कापलांत—माझ्याशीं दगलबाजी केलींत—माझ्या हजारों रुपयांचा आज चक्काचूर झाला—माझ्या घरादाराची–माझ्या आयुष्याची आज राखरांगोळी झाली ! माझ्या तोंडाला आज डांबर फांसलं गेलं ! मीं जगांतून अुठलों ! कुठं जाअूं मी आतां ? कुणाला तोंड दाखवूं ? आणा—आणा—विष आणा—जहर आणा कोठून तरी—नाहीं तर रस्त्यावरचा तो धोंडा आणून माझ्या डोक्यांत घाला ! मी आतां कसा जगूं ?

[ अुपरण्यानें तोंड झाकून हुंदके देअूं लागतो.

**भीमाशंकर :** धीर सोडूं नका—धीर सोडूं नका—शंकराचार्यांचा आशीर्वाद आहे आपल्याला—सोन्या मारुतीचा आधार आहे !—

**गोवर्धन :** ( चिडून ) बस् करा तो तुमचा सोन्यामारुती अन् शंकराचार्य ! त्यापेक्षां मी स्वतंत्र अुमेदवार म्हणून अुभा राहिलों असतों तर मला चार मतं जास्त पडलीं असतीं ! या सोन्यामारुतीनं माझा जीव घेतला ! कुठं आहे तो तुमचा शंकराचार्य ? खोटे आशीर्वाद देअून त्यांनीं मला फसवलं ! आग लावा त्या शालजोडीला !

**भीमाशंकर :** मग मी म्हणतों अजून निराश होण्याचं कारण नाहीं–आम्हीं आहोंत—

**गोवर्धन :** तुम्ही आहांत ! कशाला ? खांदा द्यायला ! का मडकं धरायला ! अडीच हजार मतं सकाळीं नोंदलीं गेलीं–त्यांतलीं पन्नास देखील मतं पडलीं नसतील मला ! आणि तुम्ही म्हणतां–धीर सोडूं नका—निराश होअूं नका ! जो येतो तो कॉंग्रेस की जय–महात्मा गांधीं की जय म्हणून ओरडतो आणि चरख्या-पुढं फुली करून चालता होतो ! माझ्या चाळींतल्या माझ्या तीनशें भाडेकऱ्यांनीं

माझ्याशीं दगलबाजी करून माझा गळा कापला ! घडघडीत माझ्यादेखत त्यांनीं कॉंग्रेसला मतं दिलीं—तो बलदेव भेटला तर जीवच घेतों त्याचा—

**भीमाशंकर :** त्यांनीं तर बाहेर असा धुमाकूळ घातला होता, कीं विचारूं नका ! दहा हजार लोक पोलिंग स्टेशनला गराडा देअून अुभे होते आणि कॉंग्रेसला मतं द्या म्हणून गर्जना करीत होते. काल रात्रीं जेधे–गाडगीळ व्याख्यान देअून गेले या पेठेंत—त्यांनीं ही सारी आग लावून दिली ! नागोबापुढं फुली कराल तर जीव घेअूं तुमचा, अशी धमकी कॉंग्रेसवाले साऱ्या मतदारांना देत होते. बाहेर पेठेंत लावलेले आपले नागोबाचे सारे बोर्ड या कॉंग्रेसवाल्यांनीं काल रात्रीं जाळून टाकले. आपले सारे मतदार घाबरून पसार झाले. कुणी घरांत दडून बसले. पोलिंग स्टेशनवर कुणी यायलाच तयार नाहीं !

**गोवर्धन :** म्हणून तुम्ही हे खोटे मतदार आणून माझी मान पोलीसाच्या हातांत गुंतवलीत ? म्हणजे अपयशाबरोबर आतां ही बेअब्रू—बदनामी –काळोखी–

**भीमाशंकर :** तुम्हीं जें सांगितलं तेंच आम्हीं केलं— कोणीच माणसं येअीनात, तेव्हां स्टेशनवर जाअून पन्नास हमाल घेअून आलों आणि त्यांना दुसऱ्या अुमेदवारांचीं नांवें नि घर–नंबर देअून आंत पाठविलं ! त्यांत चुकलं काय ?

**गोवर्धन :** चुकलं काय ? त्यांना नांवं द्यायचीं तीं जिवंत अुमेदवारांचीं नांवं द्यायचीं का मेलेल्या ? पंचवीस अुमेदवार मेलेले–पांच तुरुंगांत गेलेले !–पहिल्या तडाक्यालाच रिटार्निंग ऑफिसरनं त्यांना पकडून पोलीसच्या ताब्यांत दिलं–आज बारा वर्षं मीं हे धंदे केले; पण अेकदांहि सांपडलों नाहीं ! शेवटीं तुम्हीं माझा गळा कापलांत ! अन् तो भाअी टोळ कुठं आहे ?

**भीमाशंकर :** त्याचा तर सकाळपासून पत्ता नाहीं ! त्याचाच काय पण अेका स्वयंसेवकाचा अन् स्वयंसेविकेचा पत्ता असेल तर शपथ ! मतदार आणायला म्हणून सकाळीं सहा वाजतां मोटारी घेअून गेले सारे ते अजून येताहेत ! बरोबर सारं फराळाचं सामानहि घेऊन गेलेत आणखी !

**गोवर्धन :** काय–म्हणतां काय तुम्ही !

**भीमाशंकर :** मग काय तर ! पन्नास मोटारी होत्या ना तुमच्या ! त्यांतल्या चाळिसांचा पत्ता नाहीं ! मग मतदार आणायचे कुठून–अन् कसे ? (अुरलेल्या दहा मोटारींपैकीं पांच वाटेंत पंक्चर झाल्या ! दोनला ड्रायव्हरच नव्हते)! आणि

बाकीच्या मोटारींतून जे थोडेबहुत अुमेद्वार आणले ते मोटारींतून खालीं अुतरल्याबरोबर कॉंग्रेस की जय करीत पोलिंग स्टेशनमध्यें घुसले !

**गोवर्धन :** आजपर्यंत अितके दिवस खायला प्यायला घालून त्या टोळाला अन् स्वयंसेवकांना पोळासारखं पोसलं–अन् त्याचा अैनवेळीं आज पत्ता नाहीं म्हणतां, म्हणजे कृतघ्नतेचा कळस झाला !

**भीमाशंकर :** हें तर काय, पण जातां जातां आपल्या मतदारांच्या खुणा केलेल्या याद्या माझ्या कपाटांतून चोरून त्यांनीं कॉंग्रेसवाल्यांना विकल्या ! मी तुम्हांला पहिल्यापासून सांगत होतों, कीं या भाअी लोकांवर तुम्ही विश्वास ठेवूं नका.

**गोवर्धन :** माझ्या बायकोनं जिथं माझ्याशीं विश्वासघात केला तिथं दुसऱ्यांनीं मला फसवलं यांत कांहींच आश्चर्य नाहीं ! माझ्या पोलवर अुभी राहून धडधडीत माझ्यादेखत कॉंग्रेसला मतं द्या म्हणून ओरडते ! आज साऱ्या गांवांत माझ्या बायकोनं माझी नाचक्की केली ! साऱ्या जगांत हंसूं झालं माझं ! माझ्या अंगाचा संताप झाला–आग आग झाली–डोकं फुटायची पाळी आली ! सांगा–सांगा–काय करूं आतां !

[ पितांबर घाअीघाअीनें येतो.

**पितांबर :** आतां करण्यासारखी अेकच गोष्ट आहे—

**गोवर्धन :** म्हणजे, ती कोणती ?

**पितांबर :** राजीनामा द्यायचा–आणि निवडणुकींतून नांव मागं घ्यायचं.

**भीमाशंकर :** पण अजून दुपार आहे सबंध—

**पितांबर :** पोलिसांनीं पकडून नेलेल्या साऱ्या खोट्या मतदारांनीं तुमच्याविरुद्ध भलभलतीं स्टेटमेंट्स लिहून दिलीं आहेत. तें सारं प्रकरण सपशेल आपल्या गळ्याशीं आलं आहे ! आणि सगळ्यांत पिलोबानं तर कहर करून सोडला !

**गोवर्धन :** काय केलं त्या गाढवानं ?

**पितांबर :** मतदारांना वांटण्यासाठीं म्हणून तुम्हीं त्याला पैसे दिलेत; तर मिठाच्या पुड्या न् दहा दहा रुपयांच्या नोटा घेऊन त्यानं भरचौकांत दुकान मांडलं ! पांच मिनिटांच्या आंत पोलिसांनीं त्याला पकडलं—

**गोवर्धन :** सत्यानाश झाला !

**पितांबर :** मी पोलिस अधिकाऱ्यांना भेटून आलों! आपण निवडणुकींतून नांव मागं घेतलं तर त्या साऱ्या भानगडी आंतल्या आंतच मिटवितां येतील असं त्यांनीं आश्वासन दिलं आहे. निवडणुकींत यश येण्याची आपल्याला अेवढी देखील आशा नाहीं—मग विनाकारण ही आणखी बेअब्रू कशाला? ( कागद पुढें करून ) करा याच्यावर सही!

**गोवर्धन :** ( सही करतां करतां ) राजीनामा नाहीं हा—मृत्युपत्र आहे हें माझं! घ्या—घ्या हा राजीनामा! ( पितांबर राजीनामा घेअून जातो. ) होअूं द्या साऱ्या जगाचं समाधान! गोवर्धन आज मेला—जगांतून अुठला—त्याच्या सर्वस्वाचा सत्यानाश झाला म्हणून जगाला खदखदा हंसू द्या! गोवर्धनाच्या छातीवर बसून त्याच्या शत्रूला आज विजयोन्मादाच्या किंकाळ्या मारूं द्या!

[ आंतून विकट हास्य अैकूं येतें. बलदेव नि दोनतीन भाडेकरी आंत येतात.

**बलदेव :** सोन्यामारुतीचा जयजयकार! नागोबाचा जयजयकार—

**गोवर्धन :** सैताना—

[ त्याच्या अंगावर धांवून जातो.

**भीमाशंकर :** हं– हं– दाजीसाहेब!

**बलदेव :** दांत सपशेल पडले तरी अजून फूत्कार आहेच का नागोबाचा!

**गोवर्धन :** काय, पाहिजे काय तुला?

**बलदेव :** कांहीं नको! जें पाहिजे तें आज सारं मिळालं! जें करायचं होतं तें केलं! जें पाहायचं होतें तें पाहिलं! आज आम्हां तीनशें भाडेकऱ्यांचा आनंद गगनांत मावेनासा झाला आहे—तुम्ही या निवडणुकींत यशस्वी होणार म्हणून तुमचं आधींच अभिनंदन करायला आलोंत आम्ही!

[ ते सारे हसतात.

**गोवर्धन :** कृतघ्न–हरामखोर–दगलबाज! पांच हजार रुपये खर्च करून तुमची चाळ परवां दुरुस्त केली त्याचे हे अुपकार असे फेडलेत!

**बलदेव :** अुपकार! अितकीं वर्षं तुमच्या चाळींतला नरकवास आम्हीं गरिबांनीं सहन केला–आणि तुम्हांला जिवंत ठेवलं हे आमचे अुपकार समजा! अगदीं गळ्याला जेव्हां तांत लागली तेव्हां चाळ दुरुस्त केलींत! कशासाठीं? आमच्यावर

अुपकार करण्यासाठीं ? का आम्हीं तुम्हांला आमचीं मतं देअून निवडून द्यावं? म्हणून ! आज तुम्हांला आम्हीं निवडून दिलं असतं तर अुद्यां लाथ मारून तुम्हीं आम्हांला चाळींतून हांकून दिलं असतं—आणि अजूनहि द्याल ! आजपर्यंत आम्हां गरिबांचा जो तुम्हीं राक्षसी छळ केलांत—आमच्या बायकापोरांचे जे शिव्याशाप आणि तळतळाट तुम्हीं घेतलेंत त्याचा हा सूड आहे ! गरिबांना राग येत नाहीं—गरीब कधीं संतापत नाहींत ! पण अेकदां त्यांच्या रागाचा ज्वालामुखी पेटला म्हणजे जगांतल्या साऱ्या श्रीमंतांच्या संपत्तीचा स्वाहाकार झाल्याशिवाय राहणार नाहीं ! दहा रुपयांची नोट दिली कीं गरिबांचं पोट विकत घेतां येतं अशी आजपर्यंत तुम्ही आम्हं गरिबांची बदनामी करीत होता–आमच्या गरिबीची–आमच्या असहायतेची हेटाळणी करीत होतां–त्याचा हा सूड आहे समजलांत !

**गोवर्धन** : हा सूड जर तुम्हांला माझ्यावर घ्यायचा होता तर–तर माझं मीठ अुचलून शपथा कां घेतल्यांत–खोटीं वचनं कां दिलींत ! लक्षांत ठेवा–मीठ अुचलून निमकहरामी केली आहे तुम्हीं लोकांनीं–परमेश्वर कधीं तुमचं कल्याण करणार नाहीं !

**बलदेव** : परमेश्वर ! कोणता परमेश्वर ? तुम्ही श्रीमंतांनीं–भांडवलवाल्यांनीं—आज धर्माचं थोतांड माजवणाऱ्या या भोंदू लोकांनीं आम्हां गरिबांना बुजवण्यासाठीं नि फसविण्यासाठीं जो काल्पनिक परमेश्वर निर्माण करून ठेवला आहे तो परमेश्वर ! असल्या बागुलबुवाला भिण्याअितके आजचे गरीब मूर्ख आणि अज्ञान राहिले नाहींत ! मिठाच्या शपथा आम्हांला देतां ! कॉंग्रेसशीं बेअिमानी करणाऱ्या तुमच्यासारख्या राष्ट्रद्रोही आणि देशद्रोही अुमेदवारांच्या मिठाशीं निमकहरामी करणं यांतच खरा राष्ट्रधर्म आहे ! लक्षांत ठेवा — गरिबांचं पोट विकत घेतां येतं; पण अंतःकरण विकत घेतां येत नाहीं ! आमच्या पोटाची खळगी भरण्यासाठीं आम्हीं तुमचे पैसे खाल्ले असले तरी आमचीं अंतःकरणं आम्हीं कॉंग्रेसला केव्हांच देअून टाकलीं आहेत— बोला कॉंग्रेस की जय !

[ सारे कॉंग्रेसचा जयजयकार करीत चालते होतात ]

**गोवर्धन** : आजपर्यंत पाय चाटणारीं हीं कुत्रीं आतां बेधडक नरडीचा चावा घेअूं लागलीं ! असली हलकट हेटाळणी सहन करून आतां जगायचं ! यापुढं पदोपदीं होणाऱ्या असल्या अपमानाचे निखारे गिळून आतां आयुष्य कंठायचं ! त्यापेक्षां मेलेलं काय वाईट ! आत्महत्त्येशिवाय मार्ग नाहीं दुसरा ! चला, घेअून चला मला

तुमच्या सोन्यामारुतीकडे म्हणजे सोन्यामारुतीच्या पायरीवर डोकं आपटून प्राण देतों मी—

[ जाऊं लागतो.

**भीमाशंकर** : ( त्याल अडवून ) छे, छे, भलतंच काय !

**गोवर्धन** : व्हा बाजूला ! प्राण दिल्याखेरीज गत्यंतर नाहीं मला—

[ गिरिजा येते.

**गिरिजा** : थांबा—कुठं निघालांत ?

**भीमाशंकर** : आत्महत्या करायला चाललेत हे —

**गिरिजा** : आत्महत्या करायला ! फिरा मागं ! भ्याड—नादान—दुबळे—

**गोवर्धन** : नवऱ्याला विरोध करून आपल्या पातिव्रत्याचा झेंडा जगभर फडकवलास – आपल्या पतिप्रेमाचा डांगोरा त्रिखंडभर पिटवलास—फिरून या घरांत पाऊल टाकायला तुला लाज वाटत नाहीं ! जा– यापुढं कॉंग्रेस हाउसमध्यें जाऊन बिऱ्हाड कर, नाहीं तर शेगांवच्या आश्रमांत जाऊन संसार थाट ! जिवंतपणीं मरणाच्या यातना मला भोगायला लावल्यास आणि आतां मरणाच्या वाटेवर अपशकुन करायला पुन्हां आलीस !

**गिरजा** : मरणाच्या वाटेवर ! काय झालं मरायला तुम्हांला ! तुमच्या म्युनिसिपालिटीच्या व्यसनामुळं आज बारा वर्षं मी या घरांत नरकयातना सहन करतें आहें–मीं नाहीं जीव दिला ! निवडणुकींत अपयश आलं म्हणून जीव देतां ! मोठमोठे लोक निवडणुकींत पडतात ! मुंजे पडले–भोपटकर पडले–वालचंद पडले ! त्यांनीं नाहीं जीव दिला ? (पराभव हें पराक्रमाचं लांच्छन नसून पराक्रमाला ताळ्यावर आणणारं अंजन आहे !) निवडणुकींत यश मिळवण्यासाठीं आजपर्यंत ज्या मार्गांचा आणि साधनांचा तुम्हीं अवलंब केलांत– ते मार्ग आणि तीं साधनं आज कुचकामी ठरलीं ! त्यांचा हा पराभव आहे, तुमचा नाहीं ! हा तत्त्वाचा पराभव आहे, व्यक्तीचा नाहीं !

**गोवर्धन** : तूं मला तत्त्वज्ञान सांगतेस ! कुठल्या तत्त्वाचा पराभव आहे हा !

**गिरिजा** : हा पैसा–तत्त्वाचा पराभव आहे ! मतदारांचीं पवित्र मतं बाजारभावानं विकत घेऊन सार्वजनिक संस्थेंत निवडून येणाऱ्या मूर्ख आणि मगरूर श्रीमंतांचा

हा पराभव आहे ! लांचलुचपत, जुलूमजबरदस्ती, भीड–वशिला असल्या बेकायदे-शीर मार्गानं लोकशाहीची गंगा गढूळ करणाऱ्या गुंडगिरीचा हा पराभव आहे ! सार्वजनिक निवडणुकी अेकेका व्यक्तीनं लढवणाऱ्या तत्त्वाचा हा पराभव आहे !

**गोवर्धन :** आज बारा वर्षं मीं अेकट्यानं निवडणुकी लढवल्या आणि यश मिळवलं ! – आजपर्यंत माझा कधीं पराभव झाला नाहीं तो ! माझ्या साऱ्या मतदारांनीं – मित्रांनीं–नातेवाअिकांनीं—प्रत्यक्ष तूं या वेळीं मला फसवलंस म्हणून माझा पराभव झाला ! सारं जग माझ्यावर अुलटलं म्हणून मला हें अपयश आलं !

**गिरिजा :** निव्वळ भ्रम आहे तुमचा ! कुणी तुम्हांला फसवलं नाहीं ! तुम्हीं स्वतःला फसवलंत म्हणून तुमचा पराजय झाला ! काळाचीं चिन्हं तुम्हीं ओळखलीं नाहींत ! राजकारणाचं वारं कोणत्या दिशेनं आज वाहत आहे अिकडे तुम्हीं दुर्लक्ष केलंत ! आज राष्ट्रांत कॉंग्रेसचं सामर्थ्य केवढं आहे— बहुजनसमाजाचीं अंतःकरणं कुणाच्या बाजूचीं आहेत या गोष्टीकडे तुम्हीं जाणूनबुजून डोळेझांक केलींत आणि निवडणुकीला अुभे राहिलांत ! तुम्ही निवडून यावं अशी कुणाची अंतःकरणापासून अिच्छा होती ? आजपर्यंतच्या म्युनिसिपालिटीच्या बेजबाबदार अंदाधुंदीला सारी जनता विटून गेली होती ! अेक–अेक माणूस तुमच्या बाजूचा नव्हता ! तुमच्या घरादाराची होळी करून त्यावर स्वतःची पोळी भाजून घेण्या-साठीं तुमच्याभोंवतीं अेवढे तोंडपुजे—खुषमस्करे जमले होते । तो डाकू संपादक, तो गळेपडू पितांबर, हा ढोंगी बगळा किंवा तो अुडाणटप्पू टोळ, यांची इच्छा तुम्ही निवडून यावं अशी होती असं तुम्हांला वाटतं काय ? भ्रम आहे तुमचा ! तुम्हीं आपली फसवणूक करून नाश करून घेतलांत ! त्याचं खापर दुसऱ्याच्या डोक्यावर कशाला फोडतां ?

**गोवर्धन :** अितके डांबीस लोक आजपर्यंत मला कधीं निवडणुकींत भेटले नाहींत ! लुच्चे लोक काय मी ओळखत नाहीं ? निवडणुकी म्हटल्या कीं त्यांत लबाड, भामटे, ठक, पैसेखाऊ असल्या लोकांचं लटांबर ठेवलेलंच ! पण यंदाच्या निवडणुकींत साऱ्या अर्कट अिरसालांची परिषद भरली होती कीं काय कुणास ठाऊक !

**गिरिजा :** जोंपर्यंत निवडणुका व्यक्तिनिष्ठ असून पैशाच्या जोरावर लढवल्या जात आहेत तोंपर्यंत लबाड आणि स्वार्थसाधु भामट्यांची त्या ठिकाणीं पोळी

पिकणारच ! म्हणूनच निवडणुकीला व्यसनाचं स्वरूप आलं आहे ! दारूबाजी, शर्यती, जुगार, सट्टे यांहीपेक्षां भयंकर असं हें निवडणुकीचं व्यसन आहे ! आयुष्याचा, घरादाराचा, संसाराचा, समाजाचा सत्यानाश करणारं असें हें आजच्या लोकशाहीच्या युगांतलं राक्षसी व्यसन आहे ! या व्यसनपायीं आजपर्यंत मोठमोठ्या विद्वानांनीं, श्रीमंतांनीं, कर्तबगार लोकांनीं आपापल्या आयुष्याची धूळधाण करून घेतली आहे—तुमचीहि आज तीच गत झाली आहे ! निवडणुका पक्षनिष्ठ झाल्या तरच या व्यसनाचा नायनाट होणार आहे ! म्हणून म्हणतें, कीं हा तुमचा पराभव नाहीं ! हा व्यक्तिनिष्ठ निवडणुकीचा पराभव आहे—आणि पक्षनिष्ठ निवडणुकीचा विजय आहे !—

**भीमाशंकर :** म्हणूनच आम्हीं सोन्यामारुती पक्ष स्थापन केला !

**गिरिजा :** बस करा तुमचा सोन्यामारुती पक्ष ! नदीवर जाऊन या पक्षाचं श्राद्ध करा जा ! चार शेठजी आणि पांच भटजी अेकत्र होऊन राजकारणाच्या गप्पा मारूं लागले म्हणजे त्याला पक्ष म्हणत नाहींत ! बहुजन समाजाच्या अंतःकरणावर जो स्थापन झाला आहे त्यालाच पक्ष म्हणतात ! असा देशांत अेकच बलाढ्य पक्ष म्हणजे—कॉंग्रेस ! त्या कॉंग्रेसचा हा विजय आहे !

**गोवर्धन :** आज तूं माझे डोळे अुघडलेस, आणि मला नवीन प्रकाश दाखवलास ! तुझी ही तेजस्वी वाणी अैकून मी अगदीं थक्क झालों ! कुठून मिळवलंस तूं हें सारं शहाणपण ?

**गिरिजा :** हें शहाणपण मीं मिळवलं नाहीं — हें शहाणपण मला मिळालं— माझ्याकडे चालत आलं ! आज घरोघर प्रत्येक स्त्रीच्या तोंडून तुम्हांला हेंच शहाणपण अैकूं येअील ! तुम्हांला घमेंड आहे, कीं बायकांना लिहावाचायला शिकवलं, कीं त्या प्रेमपत्रं लिहितील ! भ्रम आहे तुमचा ! आजच्या अर्धवट शिकलेल्या आमच्यासारख्या अडाणी बायका प्रेमपत्रं लिहीत नाहींत —वर्तमानपत्रं वाचतात ! म्हणून त्यांना हें सारं कळतं ! महात्मा गांधींनीं राजकारण हें अितकं सोपं करून ठेवलेलं आहे, कीं जुन्या पिढींतल्या मुरलेल्या मुत्सद्द्यापेक्षां आजकालच्या बायकांना जास्ती राजकारण कळतं ! हाच खरा कॉंग्रेसचा विजय आहे !

[ 'कॉंग्रेस की जय !' 'कॉंग्रेसचा जयजयकार !' अशा आंतून गर्जना. प्रमोद, नंदू आणि अितर कॉंग्रेसचे कार्यकर्ते प्रवेश करतात. त्यांच्या मागून पितांबर आणि पिलोबा येतात.

हा पराभव आहे ! लांचलुचपत, जुलूमजबरदस्ती, भीड—वशिला असल्या बेकायदे-शीर मार्गांनं लोकशाहीची गंगा गढूळ करणाऱ्या गुंडगिरीचा हा पराभव आहे ! सार्वजनिक निवडणुकी अकेका व्यक्तीनं लढवणाऱ्या तत्त्वाचा हा पराभव आहे !

**गोवर्धन :** आज बारा वर्षं मीं अकट्यानं निवडणुकी लढवल्या आणि यश मिळवलं ! – आजपर्यंत माझा कधीं पराभव झाला नाहीं तो ! माझ्या साऱ्या मतदारांनीं – मित्रांनीं—नातेवाअिकांनीं—प्रत्यक्ष तूं या वेळीं मला फसवलंस म्हणून माझा पराभव झाला ! सारं जग माझ्यावर अुलटलं म्हणून मला हें अपयश आलं !

**गिरिजा :** निव्वळ भ्रम आहे तुमचा ! कुणी तुम्हांला फसवलं नाहीं ! तुम्हीं स्वतःला फसवलंत म्हणून तुमचा पराजय झाला ! काळाचीं चिन्हं तुम्ही ओळखलीं नाहींत ! राजकारणाचं वारं कोणत्या दिशेनं आज वाहत आहे अिकडे तुम्हीं दुर्लक्ष केलंत ! आज राष्ट्रांत कॉंग्रेसचं सामर्थ्य केवढं आहे—बहुजनसमाजाचीं अंतःकरणं कुणाच्या बाजूचीं आहेत या गोष्टीकडे तुम्हीं जाणूनबुजून डोळेझांक केलींत आणि निवडणुकीला अुभे राहिलांत ! तुम्ही निवडून यावं अशी कुणाची अंतःकरणापासून अिच्छा होती ? आजपर्यंतच्या म्युनिसिपालिटीच्या बेजबाबदार अंदाधुंदीला सारी जनता विटून गेली होती ! अेक—अेक माणूस तुमच्या बाजूचा नव्हता ! तुमच्या घरादाराची होळी करून त्यावर स्वतःची पोळी भाजून घेण्या-साठीं तुमच्याभोंवतीं अेवढे तोंडपुजे—खुषमस्करे जमले होते । तो डाकू संपादक, तो गळेपडू पितांबर, हा ढोंगी बगळा किंवा तो अुडाणटप्पू टोळ, यांची इच्छा तुम्ही निवडून यावं अशी होती असं तुम्हांला वाटतं काय ? भ्रम आहे तुमचा ! तुम्हीं आपली फसवणूक करून नाश करून घेतलांत ! त्याचं खापर दुसऱ्याच्या डोक्यावर कशाला फोडतां ?

**गोवर्धन :** अितके डांबीस लोक आजपर्यंत मला कधीं निवडणुकींत भेटले नाहींत ! लुच्चे लोक काय मी ओळखत नाहीं ? निवडणुकी म्हटल्या कीं त्यांत लबाड, भामटे, ठक, पैसेखाऊ असल्या लोकांचं लटांबर ठेवलेलंच ! पण यंदाच्या निवडणुकींत साऱ्या अर्कट अिरसालांची परिषद भरली होती कीं काय कुणास ठाअूक !

**गिरिजा :** जोंपर्यंत निवडणुका व्यक्तिनिष्ठ असून पैशाच्या जोरावर लढवल्या जात आहेत तोंपर्यंत लबाड आणि स्वार्थसाधु भामट्यांची त्या ठिकाणीं पोळी

पिकणारच ! म्हणूनच निवडणुकीला व्यसनाचं स्वरूप आलं आहे ! दारूबाजी, शर्यती, जुगार, सट्टे यांहीपेक्षां भयंकर असं हें निवडणुकीचं व्यसन आहे ! आयुष्याचा, घरादाराचा, संसाराचा, समाजाचा सत्यानाश करणारं असें हें आजच्या लोकशाहीच्या युगांतलं राक्षसी व्यसन आहे ! या व्यसनपायीं आजपर्यंत मोठमोठ्या विद्वानांनीं, श्रीमंतांनीं, कर्तबगार लोकांनीं आपापल्या आयुष्याची धूळधाण करून घेतली आहे—तुमचीहि आज तीच गत झाली आहे ! निवडणुका पक्षनिष्ठ झाल्या तरच या व्यसनाचा नायनाट होणार आहे ! म्हणून म्हणतें, कीं हा तुमचा पराभव नाहीं ! हा व्यक्तिनिष्ठ निवडणुकीचा पराभव आहे—आणि पक्षनिष्ठ निवडणुकीचा विजय आहे !—

**भीमाशंकर :** म्हणूनच आम्हीं सोन्यामारुती पक्ष स्थापन केला !

**गिरिजा :** बस करा तुमचा सोन्यामारुती पक्ष ! नदीवर जाऊन या पक्षाचं श्राद्ध करा जा ! चार शेठजी आणि पांच भटजी अेकत्र होअून राजकारणाच्या गप्पा मारू लागले म्हणजे त्याला पक्ष म्हणत नाहींत ! बहुजन समाजाच्या अंतःकरणावर जो स्थापन झाला आहे त्यालाच पक्ष म्हणतात ! असा देशांत अेकच बलाढ्य पक्ष म्हणजे—कॉंग्रेस ! त्या कॉंग्रेसचा हा विजय आहे !

**गोवर्धन :** आज तूं माझे डोळे अुघडलेस, आणि मला नवीन प्रकाश दाखवलास ! तुझी ही तेजस्वी वाणी अैकून मी अगदीं थक्क झालों ! कुठून मिळवलंस तूं हें सारं शहाणपण ?

**गिरिजा :** हें शहाणपण मीं मिळवलं नाहीं — हें शहाणपण मला मिळालं—माझ्याकडे चालत आलं ! आज घरोघर प्रत्येक स्त्रीच्या तोंडून तुम्हांला हेंच शहाणपण अैकूं येअील ! तुम्हांला घमेंड आहे, कीं बायकांना लिहावाचायला शिकवलं, कीं त्या प्रेमपत्रं लिहितील ! भ्रम आहे तुमचा ! आजच्या अर्धवट शिकलेल्या आमच्यासारख्या अडाणी बायका प्रेमपत्रं लिहीत नाहींत —वर्तमानपत्रं वाचतात ! म्हणून त्यांना हें सारं कळतं ! महात्मा गांधींनीं राजकारण हें अितकं सोपं करून ठेवलेलं आहे, कीं जुन्या पिढींतल्या मुरलेल्या मुत्सद्द्यापेक्षां आजकालच्या बायकांना जास्ती राजकारण कळतं ! हाच खरा कॉंग्रेसचा विजय आहे !

[ 'कॉंग्रेस की जय !' 'कॉंग्रेसचा जयजयकार !' अशा आंतून गर्जना. प्रमोद, नंदू आणि अितर कॉंग्रेसचे कार्यकर्ते प्रवेश करतात. त्यांच्या मागून पितांबर आणि पिलोबा येतात.

**गोवर्धन :** या— या — प्रमोद, तुम्हांला मला कडकडून भेटूं द्या— !

[ प्रमोद त्यांच्या पायां पडतो.

**प्रमोद :** मी निवडून आलों ही आपली कृपा आहे. हा आपला आशीर्वाद आहे–

**गोवर्धन :** तुमचं आमचं वैर संपलं ! मरणानं द्वेषाला जशी मूठमाती मिळते तशी निवडणुकीच्या निकालानंतर मत्सरालाहि मिळायला पाहिजे ! तुमचा विजय हा कॉंग्रेसच्या तत्त्वाचा विजय आहे, हें हिनं मला पटवलं ! माझ्या पराभवाची आतां मला मुळींच लाज वाटत नाहीं ! आजपर्यंत म्युनिसिपालिटींत जाऊन लोकांकडून जेवढे पैसे मिलविले तेवढे या निवडणुकींत जनताजनार्दनाच्या पायीं अर्पण करून मी आतां शुद्ध झालों आहें ! हा देखील कॉंग्रेसचाच जय आहे !

[ सारे ' कॉंग्रेस की जय ! ' ओरडतात

**नंदू :** कॉंग्रेसचं नांव घेऊं नका ! बाबा मारतील !

**गोवर्धन :** नाहीं बरं–मी आतां मारणार नाहीं ! खुशाल बोल ! कॉंग्रेस की जय ! बोल, भिऊं नकोस !

**नंदू :** किती चांगले आहांत तुम्ही आतां !! कॉंग्रेस की जय ! कॉंग्रेस की जय !

[ नंदू गोवर्धनच्या गळ्याला मिठी मारतो, तोंच घरमालक, भोपळे, ढेकणे हार घेऊन प्रवेश करतात.

**मालक :** कुठं आहेत दाजीसाहेब ? तुम्हीं राजीनामा दिलांत ! आम्हांला कळलं तसें आम्ही धांवत आलों. छान केलंत ! आम्ही पहिल्यापासून सांगत होतों, कीं तुम्ही कॉंग्रेसला विरोध करूं नका ! कॉंग्रेस म्हणजे काय गोष्ट आहे महाराज ! ( प्रमोदच्या गळ्यांत हार घालतो. ) आमचीं सारीं मतं आम्हीं कॉंग्रेसला म्हणजे तुम्हांला दिलीं, ठाऊक आहे ?

**पिलोबा :** त्या मिठाचं काय करायचं ! हजार रुपयांचं मीठ शिल्लक आहे !

**गिरिजा :** असं का ? मग असं करा–हें हजार रुपयांचं मीठ तुम्हीच घ्या आणि अेक मिठाचं दुकान अुघडा !

[ भाअी टोळ नि ताअी पोळ प्रवेश करितात.

**भाअी टोळ :** अरेच्या ! दुपारचं पोलिंग सुरू झालं तिकडे–अन् तुम्ही अिथं काय करतां ?

**गोवर्धन :** निवडणूक संपली अन् आतां तुम्ही आलांत होय ?

**भाअी टोळ :** निवडणूक संपली अितक्यांत! आणि मोटारींत आम्हीं मतदार भरून आणलेंत ते!

**गोवर्धन :** त्यांना आतां घरीं सुखरूप पोंहोचवा! जा—

**भीमाशंकर :** सकाळीं सहा वाजतां मोटारी घेअून तुम्ही दोघें गेलांत ते आतां अुगवलांत होय!

**भाअी टोळ :** मग काय तर! अेक मतदार बनेश्वराला गेला होता! त्याला पकडण्यासाठीं आम्ही सारे—

**पितांबर :** सारे म्हणजे—

**भाअी टोळ :** सारे म्हणजे—मी, ह्या, सारे स्वयंसेवक, स्वयंसेविका आणि चाळीस मोटारी—

**गोवर्धन :** अेक मतदार पकडायला अेवढी मंडळी?

**भाअी टोळ :** मग काय तर! आमचं काम नेहमीं पक्कं असतं! अुगाच नाहीं!

**भीमाशंकर :** मग आणला कीं नाहीं त्या मतदाराला?

**भाअी टोळ :** आणला म्हणजे! सोडतों काय त्याला! चेष्टा नाहीं! आतांच त्याला मंडपांत आणून सोडलं-पण त्या हरामखोरानं शेवटीं कॉंग्रेसलाच मत दिलं!

**प्रमोद :** जाअूं द्या-कशाला वाअीट वाटून घेतां!

**भाअी टोळ :** बरं, पण निवडणुकीचा निकाल काय लागला?

**गोवर्धन :** हे प्रमोद बिनविरोध निवडून आले! कॉंग्रेसचा विजय झाला!

**भाअी टोळ :** काय म्हणतां! हे निवडून आले! कॉंग्रॅच्युलेशन्स! आमची 'ही' देखील बिनविरोध निवडून आली!

**सारे :** तुमची ही! ही काय भानगड आहे?

**भाअी टोळ :** आनंदाची बातमी! सांगतों, अैका! बनेश्वराला आम्ही जो मतदार आणायला गेलों तो कांहीं लवकर सांपडेना. वेळ होता बराच. बरोबर फराळाचं सामान होतं-मंडळी होती—मोटारी होत्या-तेव्हां तेवढ्या वेळांत घेतलं लग्न उरकून झालं!

**पितांबर :** } भले शाबास!
**भीमाशंकर :** } वा भाअी!

**भाभी टोळ :** हें पहा प्रमोद, तुम्ही, ही आणि मी, आपण तिघं असल्यावर आतां सारी म्युनिसिपालिटी हदरून सोडूं !

**गोवर्धन :** तुमचा म्युनिसिपालिटीचा काय संबंध ?

**भाभी टोळ :** वा ! म्युनिसिपालिटी आतां आमच्या घरांत आली ! आतां म्युनिसिपालिटीशीं आमचा रोज संबंध !

**गोवर्धन :** प्रमोद, तुम्हांला आमचा आशीर्वाद आहे ! कॉंग्रेसच्या या राजवटींत स्थानिक स्वराज्याचा विजय होवो आणि खऱ्या लोकशाहीच्या तत्त्वाचा जनतेंत प्रसार होवो हीच आमची अिच्छा !

[ सारे कॉंग्रेसचा जयजयकार करतात आणि 'वन्दे मातरम्' हें पद म्हणतात.

पडदा पडतो.

वन्दे मातरम्